


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५७। अंक ७। एप्रिल २००४
चैत्र-वैशाख, शके १९२६
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संचालक व संपादक सहमत असतीलच असे नाही.

## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ लं, अंक १ मधील के. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाचा मंडळाच्या "नियतकालिकांचा स्थायी निधी" योजनेत समावेश केला असला तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच असे नाही.

अनुक्रमणिका








# नवभारत

एप्रिल २००४

अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# निवेदन

*'नवभारत'* मासिकाचे प्रकाशन अलीकडे फार अनियमित होत गेले. वर्गणीदार-वाचकांची अंक न मिळाल्याची पत्रे कार्यालयाकडे सतत येत राहिली. *'नवभारत'*च्या संपादन-प्रकाशनाशी संबंधित असलेल्या आम्हा सर्वांना अतिशय अपराधी वाटत राहिले. ऑक्टोबर २००२ ते मार्च २००४ अखेरच्या काळात ऑक्टोबर २००२ ते फेब्रुवारी २००३ पर्यंतचे अंक तेवढे प्रकाशित होऊ शकले.

ऑक्टोबर २००२ मध्ये प्रा. यशवंत सुमंत यांनी *नवभारता*चे कार्यकारी संपादक म्हणून कार्यभार स्वीकारला. प्रा. सुमंत यांचा व्यासंग, त्यांचा उत्साह आणि संपादकत्वाची जबाबदारी पेलण्याची त्यांची क्षमता या सगळ्यांचा विचार करून प्राज्ञपाठशाळामंडळाने त्यांची निवड केली होती. विभिन्न प्रकारच्या अडचणींमुळे त्यांना त्या त्या महिन्याचा अंक वेळेवर संपादित करून प्रसिद्ध करणे जमले नाही. त्यांच्या अडचणी ते थोड्या काळात निवारून संपादकाचे कार्य जोमाने करू लागतील अशी खात्री बाळगून आम्ही *नवभारत*च्या प्रकाशनाचे बिघडलेले वेळापत्रक सुधारून घेतले जाईल असे मानले. प्रा. यशवंत सुमंत यांनी अलीकडे मंडळाचे सचिव यांना काही काळासाठी *नवभारत*ची पर्यायी व्यवस्था करण्याची विनंती केली. (ते पत्र सोबत प्रसिद्ध करीत आहोत.) त्यांची विनंती मंडळाने सखेद मान्य केली आहे.

एप्रिल २००३ ते मार्च २००४ या काळातला अनुशेष *नवभारत*चे काही विशेषांक प्रसिद्ध करून सप्टेंबर २००४ अखेर भरून काढला जात आहे. या विशेष अंकांचे संपादन ज्येष्ठ विचारवंत प्रा. देवदत्त दाभोलकर करीत आहेत. 'आचार्य स.ज. भागवत आणि *नवभारत*ची विचारपरंपरा' हा विशेषांक येत्या महिनाभरात प्रसिद्ध होईल. 'अर्वाचीन भारतातील धार्मिक जमातवादी राजकारणाची पायाभरणी' या विषयावरील विशेषांकाचे तदनंतर जुलैअखेर प्रकाशन केले जाईल.

त्याचवेळी, एप्रिल २००४ पासूनचे अंक नियमाने त्या त्या महिन्यात प्रसिद्ध करण्याची योजना कार्यान्वित केली आहे. याची जबाबदारी संपादक मंडळ घेत आहे. एप्रिल २००४ चा अंक आम्ही एप्रिलअखेर रवाना करू शकू.

झाल्या दिरंगाईबद्दल आम्ही *नवभारत*च्या सर्व वर्गणीदार-वाचकांची क्षमा चाहतो.

**सीताराम रायकर**

३१ मार्च २००३ — सचिव, प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

---

ऑक्टो. २००२ पासून *नवभारत* मासिकाच्या कार्यकारी संपादकत्वाची जबाबदारी मी स्वीकारली होती. काही अनपेक्षितपणे उद्‌भवलेल्या व्यक्तिगत जबाबदाऱ्या आणि प्रकृती अस्वास्थ्यामुळे *'नवभारत'*चे अंक नियमित प्रकाशित होण्यामध्ये खूपच अडचणी येत गेल्या. परिणामतः *'नवभारत'*चा अनुशेषही वाढत गेला. संपादक मंडळाच्या दोन-तीन बैठकांमध्ये याबाबत सविस्तर चर्चा झाली होती व त्यातून काही मार्ग निघतो का या बाबतही सांगोपांग बोलणे झाले. परिस्थितीत काही बदल होईल व काही प्रश्न मार्गी लागतील या आशेवर, आहे ही व्यवस्था अशीच चालू ठेवावी असे त्या त्या वेळी सर्वानुमते ठरले. तथापि सद्यःपरिस्थितीत अपेक्षित बदल न होता ती अधिकच गुंतागुंतीची होत गेल्याने *'नवभारत'*चे प्रकाशन उत्तरोत्तर अनियमित व प्रलंबित होत गेले.

दि. १२।३।२००४ रोजी झालेल्या संपादक मंडळाच्या पुणे बैठकीत अंक प्रकाशनाबाबतची माझी असमर्थता मी मांडली व सध्याच्या परिस्थितीत नजिकच्या काळात फारसा बदल होणे शक्य नसल्याने कार्यकारी संपादकत्वाच्या जबाबदारीतून काही काळ मला मुक्त करावे अशी विनंती मी संपादक मंडळाला केली. संपादक मंडळानेही या विनंतीचा आदर करून पर्यायी व्यवस्था करण्याचे मान्य केले. त्यांच्या या सहकार्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

कार्यकारी संपादकत्वाची जबाबदारी मी स्वेच्छेने स्वीकारली होती. पण उपरोक्त अडचणींमुळे ती समाधानकारकरित्या पार पाडणे जमले नाही. या अडचणी दूर होताच ही जबाबदारी पुन्हा आनंदाने मी स्वीकारेन. दरम्यानच्या काळात *'नवभारत'*चे प्रकाशन वेळच्यावेळी न झाल्याने मी दिलगीर आहे. *'नवभारत'*चे लेखक, वाचक, वर्गणीदार, आजीव सभासद व सर्व हितचिंतकांनी *'नवभारत'*वरील आपला लोभ पूर्वीप्रमाणेच कायम ठेवावा हे नम्र आवाहन!

**यशवंत सुमंत**










# प्रा. मे.पुं. रेगे यांचे विचारधन

**हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन**
संवर्धित दुसरी आवृत्ती २००२ डेमी, पृ. २१५ रु. १६०.००
**प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**

**इहवाद आणि सर्वधर्मसमभाव**
प्रथमावृत्ती १९९६ डेमी, पृ. १७८ रु. ८०.००
**प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**

**विवेक आणि न्याय**
आधुनिक महाराष्ट्रातील प्रबोधनपर्व
प्रथमावृत्ती २००२ डेमी, पृ. २३२ रु. १७०.००
**प्रतिमा प्रकाशन, औदुंबर अपार्टमेंट्स, १३६२ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०**

**विवेकवाद, विज्ञान आणि श्रद्धा**
प्रथमावृत्ती २००४ डेमी, पृ. ३३६ रु. २५०.००
**लोकवाङ्मय गृह, भूपेश गुप्ता भवन, ८५ सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई ४०० ०२५**

**प्रा. मे.पुं. रेगे यांचे तत्त्वज्ञान**
संपादक : डॉ. सुनीती देव
प्रथमावृत्ती २००० डेमी, पृ. २५३ रु. २२५.००
**वितरण : राजहंस प्रकाशन, १०२५ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०**

# *शिखर शिंगणापूरचा श्रीशंभुमहादेव

**वसंत पळशीकर**



*शिखर शिंगणापूरचा श्रीशंभुमहादेव* या शोधग्रंथाचे उपशीर्षक 'शिवछत्रपतींचा कुलस्वामी श्रीशंभुमहादेव आणि शिखरक्षेत्रात त्याची प्रतिष्ठापना करणारे भोसले घराणे यांच्या दक्षिण-संबंधाची शोधकथा' असे आहे. छत्रपती शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेक-प्रसंगी भोसले कुळाचा संबंध सिसोदे या राजपूत कुळाशी व राजघराण्याशी जोडला गेला आणि त्याला आधुनिक काळात शिष्टमान्यताही लाभली. हा विशिष्ट संबंध जोडण्यामागे शिवाजीमहाराजांचे क्षत्रियत्व सिद्ध करण्याची तत्कालीन मानसिक-ऐतिहासिक निकड होती, आणि ती गरज भागलीही. पण सत्य काही वेगळेच आहे ही धारणा ब्राह्मण व मराठा समाजांतील अनेक श्रेष्ठींच्या मनात कायम राहिली असली पाहिजे. एरवी विसाव्या शतकाच्या आरंभी कोल्हापूरकर शाहूछत्रपतींच्या काळी 'वेदोक्त प्रकरण' उद्‌भवते ना. डॉ.रा.चिं. ढेरे यांना शिवछत्रपतींच्या घराण्याविषयी परमादर आहे. पण हे घराणे राजपूत होते/आहे हे ऐतिहासिक सत्य नव्हे; सत्याचा शोध घ्यायला हवा, असे त्यांच्या मनात खोलवर ठसलेले होते.

भोसले कुळ हे कधीकाळचे राजपूत सिसोदे घराणे नव्हे, हे सिद्ध करण्यासाठी ढेरे यांनी मूळात शोधयात्रा हाती घेतली नसावी. ऑक्टोबर १९८८ मध्ये डॉ. ॲन फेल्डहाऊस व श्री. वा.ल. मंजूळ या स्नेह्यांबरोबर एका शोधयात्रेहून पंढरपूरवरून परतताना शिखर शिंगणापूरच्या डोंगराकडे पहात ते म्हणाले, "मला केव्हा तरी शिखर शिंगणापूरच्या शंभुमहादेवाविषयीही संशोधन करायचे आहे. एक स्थान (पंढरपूर) वैष्णवांचे आहे आणि दुसरे शैवांचे आहे; तशीही या दोन्ही स्थानांची सामाजिक पार्श्वभूमी कोळी-गवळी समाजांनीच सिद्ध केलेली आहे. जर मी हे काम करू शकलो, तर तो विठ्ठलविषयक शोधप्रकल्पाचाच उत्तरार्ध ठरेल." (प्रस्तावना, पृ. आठ-नऊ) त्याच प्रस्तावनेत ते म्हणतात, "या विषयाचे संशोधन सुरू झाल्यावर पहिल्या चार-सहा महिन्यांतच जे सत्य माझ्यापुढे उभे ठाकले, त्याच्या ओझरत्या दर्शनानेही मी दिपून गेलो." (प्रस्तावना, पृ. सात) भोसले कुळ हे राजपूत कुळ नव्हे, ते दक्षिणेतलेच एक कुळ आहे आणि ते गवळी समाजातून आलेले आहे हे सत्य त्यांच्यापुढे उभे ठाकले.

शिखर शिंगणापूरचा शंभुमहादेव हा भोसले कुळाचा कुलस्वामी आहे आणि भोसले कुळाचा मूळ पुरुष बळीप याच्या अनन्य भक्तीपोटी शिखर शिंगणापूर येथे शिव येऊन राहिला, हा बळीप मोठा राजा होता व तो 'सोरट' देशातून शिखर शिंगणापूर येथे शिवाच्या पाठोपाठ स्थलांतरित झाला, हा ढेरे यांना लागलेला शोध. ते प्रतिपादित असलेल्या भोसले घराण्याच्या दक्षिण-संबंधाच्या गाभ्याशी त्यांचा हा शोध आहे. पहिल्या चार-सहा महिन्यांतच जे सत्य त्यांच्यापुढे उभे ठाकले, ते हे. पृ. ७८ वर ते म्हणतात, "शिवछत्रपतींच्या कुळाचा मूळ पुरुष बळीप या नावाचा आहे; तो राजेपद मिरविणारा आहे; त्याचे कुळ गवळ्याचे आहे, म्हणजेच तो यादव घराण्यातला आहे; त्याचे क्षत्रियत्व लोकांनी निःशंकपणे स्वीकारले आहे; तो सूर्यवंशी आहे; त्याच्या परम शिवभक्तीमुळेच शिखर शिंगणापूर येथे शंभुमहादेव विसावलेला आहे; त्याचा काल नेमका निश्चित करता येत नसला, तरी तो नामदेव-चक्रधरांपूर्वीच लोकादराचा विषय झालेला आहे, हे आपल्याला नामदेव-चक्रधरांच्या तद्‌विषयक उद्‌गारांतून समजले आहे."

भीमा-नीरा नद्यांच्या प्रदेशात, माणदेशात जनमानसात गाढ श्रद्धेने भाविकपणे स्वीकृत असलेल्या, नामदेव-चक्रधर यांच्या तोंडून सांगितल्या गेलेल्या एका लोककथेचा आधार त्यांच्या प्रतिपादनाला असल्याचे स्पष्ट आहे.

त्यांच्या बृहत् ग्रंथाच्या पहिल्या पाच प्रकरणांमध्ये ही लोककथा तिच्या विभिन्न रूपांमध्ये (versions) ढेरे यांनी त्यांच्या अभ्यासपूर्ण टिप्पणीसह सादर केली आहे. या कथेत भूमिका वठविणाऱ्या ज्या अनेक व्यक्ती आहेत त्यांच्याशी संबद्ध अशी अनेक स्थळे या प्रदेशात विखुरलेली आहेत. लोकांची ती श्रद्धास्थाने आहेत. त्या स्थळी घटना घडल्याचे

---

* *शिखर शिंगणापूरचा श्रीशंभुमहादेव,* रा.चिं. ढेरे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे, २००१; रू. ५००.००.




अनुक्रमणिका





सांगितले गेले आहे, व त्यांचे भौतिक आविष्कारही आढळतात — मंदिरे, शिल्पे, वास्तू इत्यादी स्वरूपात. या 'पावित्र्यसंभारा'चे ('Sacred Geography'/Complex') हृद्य दर्शन ढेरे तन्मय होऊन सश्रद्ध मनाने घडवितात.

विविध रूपांमध्ये प्रचलित असलेल्या या लोककथेचा व तिच्याशी संबद्ध स्थळांचा, तिच्यात अंतर्भूत विभिन्न जनसमूहांच्या आंतरसंबंधांचा, त्यांमध्ये घडून आलेल्या स्थित्यंतरांचा ऐतिहासिक, मानववंश व संस्कृतीशास्त्रीय (Anthropological-historical), समाजशास्त्रीय, आर्थिक-सामाजिक अभ्यास गंभीरपणे व सखोल स्वरूपात केला गेलेला नाही. तो व्हायला हवा यात काही शंका नाही.

हिवंजा कोळीरूप शिव व बळीप गवळीरूप अनन्य शिवभक्त यांची ही कथा आहे. शिव हिवंजा कोळ्याच्या रूपात या कथेत दाखविला आहे. आणि बळी (बळीप, बळीयपा) हा गवळी (वा गवळी - धनगर) दाखविला आहे ही अर्थपूर्ण गोष्ट आहे. याचा एक अर्थ असा करता येईल की, शिव हे ज्यांचे दैवत होते तो कोळी जनसमूह हा तेथील डोंगरांमध्ये व जंगलांमध्ये राहणारा मूळ रहिवासी जनसमूह होता, आणि मूळात शिव (शंभु) हा वनदेव होता. डोंगरशिखरावर, वनराईमध्ये त्याचे स्थान असे. मूर्तीही नसे; अनघड लहानशी शिळा, जिच्यात लोकांना वनदेवाचा/वनदेवीचा आढळ होई. तर गवळी हे कोठून तरी स्थलांतर करून आलेले, बरोबर गुरे-ढोरे, शेळ्या-मेंढ्या यांचे कळप घेऊन आलेले. या प्रदेशात स्थिरावल्यावर या स्थलांतरित समूहाने येथील 'वनदेव' स्वतःचा देव म्हणून स्वीकारला. या साऱ्या प्रक्रियेलाच एका मिथकीय लोककथेचे रूप प्राप्त होणे अगदी स्वाभाविक होते.

या कथेचे मूळ रूप किती प्राचीन असेल? सिंधु संस्कृतीचा जो कालखंड आहे तेथपर्यंत या कथेची मुळे जाऊन पोचतात असे म्हणता येईल. भारतातले आदिवासी जनसमूह हे पशुपालक जनसमूह कदापि नव्हते, हे आजही आपण अनुभवू शकतो. पशुपालक समाज हे स्थलांतरित जनसमूह आहेत हे जाणले तरच हिवंजा कोळी-बळीप गवळी यांची लोककथा आपण समजून घेऊ शकतो.

इतिहासाच्या ओघात या प्राचीन लोककथेचीही अनेक रूपांतरे (versions) होणे स्वाभाविक व अटळच होते. उईल शर्मा हे ब्राह्मण पात्र या कथेत एका टप्प्यावर येते आणि कथेत रूपांतर घडवून आणते. या प्रदेशात चातुर्वर्ण्याधिष्ठित विषम व्यवस्था प्रस्थापित होण्याचा, केली जाण्याचा हा टप्पा कोणत्या काळातला असावा? — तात्पर्य हे की, लोककथांमध्ये घडून आलेल्या या व यांसारख्या बदलांच्या आधारे इतिहास जरूरच जाणून घेता येईल, पण तो शोध ढेरे फारसा घेत नाहीत. उदाहरणार्थ, प्रस्तुत ग्रंथातील 'क्षेत्रनिर्माता बळियप्पा गोपती शिरसाट' या प्रकरणात ढेरे सांगतात की एक काळ असा होता की जेव्हा शिखरावरील देव 'वनदेव' होता. म्हणजे तो 'शिव' या नावाने प्रतिष्ठित झाला नव्हता. हे शिवाचे स्थान आहे असे ठरवून येथे झालेली मंदिरांची निर्मिती, मूर्तीची निर्मिती, शिखराच्या परिसरात पवित्र स्थळांच्या संभाराची (Sacred Geography/Complex) निर्मिती हे एक मोठे सामाजिक, राजकीय व धार्मिक स्थित्यंतर आहे. गवळी-धनगर समाज राज्ये स्थापन करण्याच्या, स्वतःच्या सत्तेला आधार व प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यासाठी धर्मस्थळांच्या उभारणीच्या टप्प्यावर आल्याचे ते लक्षण आहे. हा काळ कोणता? मूर्ती, मंदिरे, अन्य शिल्पे, तळी इत्यादींची निर्मिती भारतात सर्वत्र — विशेषतः दक्षिणेमध्ये — साधारण एकाच काळी घडून आली, आणि ती मूर्तिभंजक मुसलमानी राजवटी येथे स्थापन होण्या काही शतके आधी असे म्हणता येते.

ग्रंथाच्या ६व्या व ७व्या प्रकरणांचे मथळे बोलके आहेत. ते असे: 'शहाजीराजांच्या मूळ पुरुषाची कथा' आणि 'बळीप: भोसले कुळाचा मूळ पुरुष'. वेदपंडित याने रचलेल्या *संगीत मकरंद* या ग्रंथावर, तसेच जयराम पिंड्येकृत शहाजीप्रशस्तींपर रचनेवर ढेरे यांचे प्रतिपादन आधारलेले आहे. या दोन पंडित/कवी यांच्या रचना ऐतिहासिक तथ्य प्रस्थापित करण्यासाठी आधारभूत कशा ठरू शकतील? लोककथेच्या आधीच्या रूपांमधील बळीप हा हिवंजा कोळ्याचा मित्र, व हिवंजा हे शिवाचेच रूप आहे हे कळल्यावर त्याच्यापासून कधीही आपण दुरावू नये ही इच्छा बाळगणारा अनन्य शिवभक्त आहे. लोककथेतील भक्त बळीप हा गवळी राजघराण्यातला ऐतिहासिक राजपुरुष असल्याचा 'शोध' ढेरे यांना ज्या ग्रंथांच्या व लेखकांच्या आधारे लागतो ते वस्तुतः ऐतिहासिकदृष्ट्या आधारच नव्हेत. अलिकडच्या काळात रचलेली संस्कृत-मराठी स्थळमाहात्म्ये ही विशिष्ट मतलब साधण्यासाठी रचलेली काव्ये होत. "चिन्मयदासाने... कलियुगातील (म्हणजे ऐतिहासिक) शंभुमहादेवभक्तांची कहाणी सादर केली आहे." (पृ. ३५) हे ढेरे यांचे विधान वाचून आश्चर्य वाटते. चिन्मयदास लोककथेचे

रूपांतर प्रतिष्ठित उच्चवर्णीय सांस्कृतिक-ऐतिहासिक कहाणीत करीत आहे, आणि त्या दृष्टीने 'कलियुगातील भक्त' असा उल्लेख जाणीवपूर्वक करीत आहे. शिखरस्थ शिवाचा अनन्य भक्त असलेला बळीप हा "वामनावतारातील विष्णूशी संबंधित असलेल्या बळिदैत्याचाच अवतार आहे, अशी श्रद्धा चिन्मयदासाने प्रकट केली आहे" (पृ. ३६) असे ढेरे लिहितात. चिन्मयदासां-सारखे कवी जेव्हा रचना करतात तेव्हा ब्राह्मणश्रेष्ठत्व ठसविणाऱ्या गोष्टी ते कथेत प्रविष्ट करतात. अशा चिन्मयदासावर — ज्याच्या काव्याचा रचनाकाळ इ.स. १८१० आहे — ढेरे यांनी विसंबावे याचे आश्चर्य वाटते. बळीप हा ऐतिहासिक राजपुरुष होऊन गेला; तो यादवकुलीन गवळी राजा होता, इत्यादी 'तथ्ये' ढेरे ऐतिहासिक प्रमाणांनी सिद्ध तथ्ये म्हणून सांगतात. पण त्यांचा हा दावा आपण स्वीकारू शकत नाही.

माणदेशात शिखर शिंगणापूरच्या परिसरात जो 'पावित्र्य-संभार' (Sacred Complex) जागोजाग आढळतो त्यामुळे त्या निर्मितीचा आधार असलेली लोककथा व तिच्यातील पात्रे/घटना ऐतिहासिक ठरत नाहीत; पावित्र्य संभाराला जन्म देण्याइतकी ती लोककथा प्रभावी ठरलेली असते, इतकेच.

शिवाय, ही कथा प्राचीनकालीन आहे. तिच्यात नामदेव-चक्रधरांच्या काळापर्यंत तरी फार मोठा फरक पडलेला दिसत नाही. भोसलेकुळाचा राजकीय उत्कर्ष हा पुष्कळच पुढचा आहे.

ढेरे यांच्याही कथनानुसार भोसलेकुळाचा राजकीय उत्कर्ष ठळकपणे मालोजीराजे—विठोजीराजे यांच्या कर्तृत्वाने सुरू होतो. बाबाजी या त्यांच्या वडिलांचा उल्लेख बाबाजीराजे असा काही दस्तऐवजांमध्ये येतो हे खरे; पण तत्कालीन लष्करी मोहिमांमध्ये पाईकापेक्षा दोन पायऱ्या वर चढलेल्यांचा उल्लेख लोक 'राजे' म्हणून करू लागत याचे ही गोष्ट द्योतक म्हणायला लागते. या काळात त्या प्रदेशात निजामशाही ही मुसलमानी राजवट होती आणि अन्य शाह्यांशी व मुघलांशी तिच्या, स्वतःचे अस्तित्व टिकवून ठेवण्यासाठी सतत लढाया चालत होत्या. मालोजी व विठोजी या बाबाजींच्या मुलांनी या संधीचे चीज करीत, भीमा-नीरा या नद्यांच्या परिसरातल्या प्रदेशात स्वतःचे एक प्रभुत्वक्षेत्र निर्माण केले. वेरूळच्या परिसरामधून भोसले कुळाचे हे जे स्थलांतर घडून आले त्यामुळे त्यांचा शिखर शिंगणापूर या शिवस्थानाशी संपर्क झाला; किंवा, असे म्हणूया की, ते शिखरस्थ शंभु-महादेवाच्या प्रभावक्षेत्रात दाखल झाले.

भोसलेकुळ हे आधीपासूनच शिवोपासक होते असे दिसते. ज्या प्रदेशात त्यांचा राजकीय प्रभाव उत्पन्न झाला आणि त्यांना मोकाशाच्या रूपाने जहागिऱ्या प्राप्त झाल्या, वा वतने प्राप्त झाली, त्या प्रदेशात दोन लोकदेवते अग्रभागी होती – पंढरपूरचे श्रीविठ्ठल हे एक आणि शिखर शिंगणापूरचा शंभुमहादेव हे दुसरे. आता, येथे एक गोष्ट ध्यानात घेणे महत्त्वाचे आहे. चक्रधरांची महानुभावी शिकवण व त्यांनी प्रवर्तित केलेला पंथ तसेच नामदेव-ज्ञानेश्वर यांनी पुष्टी केलेला वारकरी संप्रदाय हे दोन्ही त्या काळातले बंडखोर, परिवर्तनवादी पंथ होते. या उलट शिखर शिंगणापूरचा शंभुमहादेव, तुळजापूरची भवानी ही लोकदेवते त्यांचे लोकधर्मीय स्वरूप टिकवून होती; त्यांच्या उपासनेचे स्वरूप यातुनिर्भर (Magico-religious) होते. भोसलेकुलीन पुरुषांची मनोधारणा लोकधर्मीय होती, व पुढेही बव्हंशी तशीच राहिली. नव्या प्रदेशात स्थिर झाल्यावर त्यांनी शिखर शिंगणापूरचा शंभुमहादेव व तुळजापूरची भवानीमाता ही आपली कुलदैवते, आराध्यदैवते म्हणून निवडली असणे स्वाभाविक आहे. शिखर शिंगणापूर क्षेत्री मालोजीराजांनी तलावाची निर्मिती केली त्यामागे भक्तीची भावना तर होतीच; पण, शंभुमहादेवाला भजणाऱ्या त्या सर्व प्रदेशातील बहुजनसमाजाच्या मनात स्वतःच्या वाढत्या राजकीय कर्तृत्वाला व सत्तेला अधिमान्यता प्राप्त करून घेण्याचा देखील हेतू असेल तर ते अजिबात गैर वा अस्वाभाविक नव्हते. पंढरपूरचा विठोबा हे एव्हाना वैष्णवांचे दैवत म्हणून प्रतिष्ठित झाले होते. हेही एक कारण असेल की, ज्यामुळे श्रीविठ्ठलाप्रती भोसलेकुळाची भक्ती जडणे शक्य नव्हते.

"शिखरक्षेत्रात शंभुमहादेव या नावाने मल्लिकार्जुनाचे प्रकटन घडविणारा बळियप्पा हा आद्य भक्त शहाजीराजांच्या भोसले घराण्याचा मूळपुरुष आहे, अशी साक्ष त्यांच्या आश्रयाला आलेल्या दोन संस्कृत कवींनी निःसंदिग्ध शब्दात दिलेली आहे." (पृ. ३२९). आश्रयाला आलेले, संस्कृत भाषेत रचना करू शकणारे ब्राह्मण कवी स्वतःच्या साक्षीने निःसंदिग्ध शब्दात जे सांगतात त्याविषयी वस्तुतः पक्की शंकाच ढेरे यांनी घ्यायला हवी.

राज्यकारणात उत्कर्ष पावणाऱ्या अशा कुलांना लोकमानसात व शिष्ट समाजात सुप्रतिष्ठित करण्यामध्ये ब्राह्मण पंडित, कवी आदि मंडळींची भूमिका भारतीय समाजात निर्णायक महत्त्वाची राहिली आहे. याचे मुख्य कारण हे की राज्य करणे

हे क्षत्रियांचे काम आहे ही चातुर्वर्ण्याच्या विचारप्रणालीला अनुसरून असलेली पारंपारिक मान्यता. याची जाण ढेरे यांनी प्रकट केली आहे. ते लिहितात, "दक्षिणेतील अनेक कुळांनी असाधारण कर्तृत्व गाजवून राज्ये मिळवली-चालवली होती आणि क्षत्रियोचित गुणांच्या बळावर क्षत्रियत्वही प्राप्त केले होते, हा इतिहास आपण विसरू नये." शिवाजीमहाराजांचा 'देवत संप्रदाय' (cult) जोपासणाऱ्या आजच्या मंडळींचा, त्यांचे घराणे हे मूळापासूनच क्षत्रियवर्णीय राजघराणे होते हे सर्वांनी मान्य करावे, त्यातही ते सिसोदिया वंशातील राजघराणे होते, हा कमालीचा आक्रमक आग्रह आहे. ती त्यांची मानसिक, सांस्कृतिक व व्यावहारिक गरज असल्याचे दिसते. पण. सत्यशोधनासाठी बद्धपरिकर असणाऱ्यांना याची गरज भासू नये. भोसलेकुळाने मालोजीराजांच्या काळापासून पुढे क्षत्रियोचित गुणांच्या व कर्तृत्वाच्या बळावर क्षत्रियत्व प्राप्त करून घेतले हा इतिहास त्यांना पूर्ण समाधान देणारा ठरावा.

ह्या दृष्टीने प्रस्तुत ग्रंथातील 'बळीप : भोसले कुळाचा मूळ पुरुष' हे प्रकरण महत्त्वाचे आहे. प्रकरणाच्या आरंभीच आपल्या ध्यानी येते की, शहाजीराजांनी स्वतःचे स्वतंत्र राज्य जरी निर्मिले नसले तरी, एक मातब्बर सरदार यापलीकडे पोचणारी झेप त्यांनी घेतली होती. बंगळुरु प्रांती त्यांनी त्यांच्या उत्तर आयुष्यात जवळपास स्वतंत्र म्हणावे असे राज्य प्रस्थापित केले होते. म्हणजे, एका अर्थी, त्यांनी कर्तृत्व व गुण यांच्या बळावर व्यवहारात क्षत्रियत्व सिद्ध केले होते. पण मूळापासूनच भोसले हे क्षत्रिय राजघराणे होते हे प्रस्थापित करण्यासाठी वंशावळ रचण्याची गरज होती. तत्कालीन प्रतिष्ठेच्या आणि धारणांच्या चौकटीत हे कार्य ब्राह्मण पंडित व कवीच पार पाडू शकत होते. ढेरे यांनी दाखवून दिल्याप्रमाणे, हे काम वेदपंडित, जयराम पिंड्ये यांनी त्यांच्या संस्कृत-मराठी रचनांद्वारा पार पाडले. वंशावळ तयार करावयाची, ती सुप्रतिष्ठित करावयाची तर 'मूळ पुरुष' थोर व राजा असावा लागतो. ढेरे यांच्या विवेचनावरून स्पष्ट होते की, बाबाजीराजांच्या मागच्या दोन-एक पिढ्या सोडल्या तर तत्पूर्वीच्या स्वतःच्या पूर्वजांविषयी भोसले घराण्यातील पुरुषांना पक्की माहिती नव्हती. (अभिमानाने स्मृती जागवावी असे फारसे काही नाही, हेही कारण असू शकते.) त्यांनी इतिहाससंशोधक श्री. ग.ह. खरे यांचे म्हणणे उद्धृत केले आहे. ढेरे लिहितात, "*संगीत मकरंदाच्या* शहाजी-प्रशस्तीत आलेला खेलोजी-परसोजी-बाबाजी हा क्रम आणि 'भोसलेवंशावली'त आलेला एकोजी-परसोजी-बाबाजी' हा क्रम देऊन श्री. खरे यांनी म्हटले आहे की, 'जवळजवळ शिवाजीसमकालीन दोन लेखकांना भोसले कुळातील बाबाजीपलीकडील केवळ दोन पिढ्यांची नावे माहीत होती. त्यापैकी बाबाजींच्या पितृनामाविषयी दोघांची एकवाक्यता आहे, तर पितामहनामाविषयी मताभिन्नता आहे.' " (पृ. ९६). याचा अर्थ असा की, बाबाजींच्या काळी भोसलेकुळाच्या उत्कर्षाला आरंभ झाला (ते 'राजे' म्हणून संबोधले गेले), त्या आधीच्या काळी ते शेती व शिपाईगिरी, दोन्ही करणारे वेरूळ परिसरातील एक साधारण कुळ असावे. त्या टप्प्यावर प्राचीन काळापर्यंत मागे जाऊन क्षत्रियत्व प्रस्थापित करण्याची गरजही नव्हती, आणि तसा प्रयत्न केलाच असता तर त्याला मान्यताही मिळाली नसती. सामान्य स्थितीतल्या व्यावहारिक गरजेनुसार माणसे पूर्वजांची स्मृती बाळगतात.

पण शहाजीराजांनी आदिलशाहीच्या 'आश्रया'खाली दक्षिणेत कर्नाटक-तामिळनाडू प्रदेशात जवळपास स्वतंत्र म्हणावे असे राज्य प्रस्थापित केल्यावर, क्षत्रियत्वाला साजेसे कर्तृत्व व गुण प्रकट केल्यावर, राजा म्हणून सुप्रतिष्ठित करणारी वंशावळ ही त्यांची निकड बनली असे म्हणता येईल. या संदर्भात ग्रंथाच्या अखेरच्या 'यादवांचे योगदान' या प्रकरणात ढेरे लिहितात, "ज्यांना समकालीन परंपरानिष्ठ समाजाकडून 'क्षत्रिय' म्हणून मान्यता नव्हती अशा कुळांतून, अशा समाजस्तरांतून उदय पावलेल्या आणि आपल्या कर्तृत्वाच्या बळावर राज्य प्राप्त करणाऱ्या पुरुषांना क्षत्रियत्व प्रदान करायला मुसलमानपूर्व काळात पुरोहितवर्ग सहज पुढाकार घेत असे, हे ऐतिहासिक वास्तव आहे... परंपरानिष्ठ समाजात क्षत्रिय-प्रतिष्ठेसाठी आणि राज-प्रतिष्ठेसाठी ब्राह्मणांच्या आणि साधुसंतांच्या मान्यतेची नितांत गरज असे. अशा मान्यतेशिवाय कोणाही राज्यकर्त्याला 'राजा' म्हणून जनसमर्थन लाभत नसे." (पृ. ३४३) ढेरे पुढे म्हणतात, "समाजमान्य क्षत्रिय कुळात जन्म न लाभलेल्या कर्तृत्ववान पुरुषाला व्यापक जनसमर्थनासाठी आवश्यक ठरणारी प्रतिष्ठा तीन मार्गांनी प्राप्त करता येत असे : एक तर पुरोहितांच्या मान्यतेने आपले कुळ एखाद्या पौराणिक क्षत्रिय राजवंशाशी जोडणारी वंशावळ सिद्ध करणे अथवा दिव्य कोटीत आपले कुळ उदय पावले आहे असे सांगणारे नवे मिथक प्रसृत करणे हा एक मार्ग; अथवा हिरण्यगर्भदानाचा विधी पुरोहितांकरवी यथासांग पार पाडून आपल्या शूद्र मानल्या गेलेल्या पूर्वजन्माचा


अनुक्रमणिका

अंत घडविणे आणि नवा दैवी जन्म प्राप्त करणे हा दुसरा — 'द्विजत्व' प्राप्तीचा — मार्ग; आणि उभ्या समाजाच्या आत्यंतिक श्रद्धेचा विषय असलेल्या दैवताच्या भक्तमंडलात आपण अग्रणी असल्याचा भाव समाजमनात ठसविणे हा तिसरा मार्ग." (पृ. ३४३). वेदपंडित व जयराम पिंड्ये यांच्या रचना पाहिल्या म्हणजे शहाजीराजांनी पहिल्या व तिसऱ्या मार्गांचा अवलंब केला असे म्हणता येते.

शहाजीराजांच्या भोसले घराण्याचा मूळ पुरुष कोण याचा तपास लागत नाही; भोसले घराण्यातील मंडळींना बाबाजीराजांच्या पूर्वीच्या दोन पिढ्यांपलिकडची माहितीही धड नाही व स्मृतीही नाही; आपण कोण्या राजघराण्यातले, काही काळ दुर्भाग्यवशात् उपेक्षित (obscure) राहावे लागलेले असे आहोत अशीही स्मृती नाही, हे ऐतिहासिक वास्तव ढेरे मोकळेपणी का स्वीकारू शकत नाहीत, असाच खरे तर प्रश्न पडतो.

छत्रपती शिवाजीमहाराज हे क्षत्रिय राजघराण्यातले होते असे सिद्ध करता आले नाही तर शिवाजीमहाराजांच्या थोरवीला कोणतेच उणेपण येत नाही; चातुर्वर्ण्य व जातपातजन्य उच्चनीचता यांच्या पलीकडे जाण्याच्या, लोकशाहीच्या, समतेच्या आजच्या युगात उलट त्यांची महती वाढते असे आपण अभिमानाने म्हणू शकतो.

उपरोधाची आणखी एक गोष्ट आहे, आणि ती पण एक अडचण आहे, मानली तर. 'मराठा' ही पारंपारिक अर्थाने जातही नाही, जमातही नाही, की वर्णही नाही. मऱ्हाट/महाराष्ट्र देशीचे वा मऱ्हाटी भाषा बोलणारे ते मराठे असे म्हणणे वास्तवाला अधिक धरून होईल. दुसऱ्या अंगाने पाहिल्यास, नांगराच्या सहाय्याने शेती करणारा, गावे वसवून स्थिरपणे राहणारा समाज अस्तित्वात आला त्यानंतर जी ग्रामव्यवस्था आकारास आली तिची बांधणी जमिनीवर वंशपरंपरा मालकी सांगणाऱ्या वतनदार शेतकरी वर्गाभोवती झाली. पण सर्वच काही वतनदार घराणी नव्हती, व होऊ पण शकत नव्हती. ब्राह्मण, बलुतेदार, अस्पृश्य व भटके, तत्सम अन्य यांमध्ये मोडणारे सोडता, शेतकरी समाजातला जो श्रेष्ठी वतनदार वर्ग आकारास आला तो एका अंगाने गावोगावी 'राज्यकर्ता' वर्गही होता. निव्वळ शेतीत राबणारे, सत्ताविहीन, परावलंबी — त्यांची जमिनीवर औपचारिक मालकी असली तरी — ते 'कुणबी', तर मालमत्तावान व सत्ताधारी ते 'मराठा' अशी विभागणी व्यवहारात पडत असे असे दिसते. मध्ययुगातील राजवटीमध्ये राजे-सम्राट यांच्याकडून जहागिरी, इनामे प्राप्त होणे, पाटीलकीचे — देशमुखीचे वतन असणे, राजवटीत अधिकारपद असणे यांना साहजिकच महत्त्व आले. धनदौलत व सत्ता यांचा संचय करण्यासाठी, त्यांच्यात भर घालण्यासाठी, आणि धन व सत्ता यांच्या कसोटीवर वर वर चढून जाण्यासाठी यांचा उपयोग होता. शेतीवर गुजराण करणारे, गुरेढोरे, शेळ्या-मेंढ्या यांचे कळप बाळगणारे कुणबी-गवळी-धनगर आदि हे चातुर्वर्ण्याधिष्ठित वर्ण-जाती व्यवस्थेत शूद्र स्थानी गणले जात. पण त्यांच्यापैकी कर्तबगार व्यक्ती-घराणी यांना राज्ये संपादन करून क्षत्रियत्वावर दावा सांगण्या-इतका, तो दावा ब्राह्मण, पंडित-कवी, पुरोहित यांच्या सहाय्याने मान्य करवून घेण्याइतका खुलेपणा, लवचिकता, गतिमानता व संधी व्यवस्थेत होती. ही शिडी — शूद्र ते क्षत्रिय — चढून जाण्याच्या खेळात जे उतरू शकत ते कुणब्यांपासून स्वतःला वेगळे करण्यासाठी आपल्या कुळी 'खानदानी कुळी' असल्याचे मध्ययुगीन काळात आग्रहपूर्वक सांगू लागले. क्षत्रियत्वावर यशस्वीपणे दावा सांगता येण्यासाठी आपले कुळ/घराणे खानदानी असल्याचे सांगता येणे याला महत्त्व प्राप्त झाले.

भोसले कुळातल्या बाबाजींना त्यांच्या आसपासचे लोक 'राजे' म्हणून संबोधू लागले, कागदोपत्री तसा उल्लेख होऊ लागला ही त्यांनी त्यांच्या घराण्याला 'खानदानी कुळ' म्हणून मान्यता मिळवून घेतल्याची खूण आहे. यासाठी आवश्यक तो राजकारणातला, लष्करी पेशातला उत्कर्ष त्यांनी साधलाही होता. मालोजीराजे-विठोजीराजे, शहाजीराजे, शिवाजीमहाराज हे स्वकर्तृत्वाने पायऱ्या चढत गेले. खानदानीपणाचा दावा कुळ, घराणे, पातळीवर होता. 'मराठे' या शब्दात या सर्व काळात या मऱ्हाट देशातले, मऱ्हाटी भाषा बोलणारे अशा सर्वांचा समावेश ही केला जात होता.

'क्षेत्रनिर्माता बळियप्पा गोपती शिरसाट' या प्रकरणात शिखर शिंगणापूर येथे प्रथम मंदिरांची निर्मिती कोणी कोणी केली, आणि सेवेकऱ्यांची कामे कोणती कोणास नेमून दिली ह्याचे ढेरे यांनी एका ताम्रपटाच्या प्रकाशित संहितेच्या आधारे विवरण केले आहे. हा ताम्रपट आज उपलब्ध नाही. तो बनावट असल्याचे डॉ. शं.गो. तुळपुळे यांचे मत ढेरे यांनी अमान्य केले आहे. हा ताम्रपट इ.स. १६८१ चा आहे, आणि त्याचे स्वरूप पूर्ववृत्त नोंदणे असे आहे, असा खुलासा ढेरे करतात. ढेऱ्यांचे म्हणणे स्वीकारून या ताम्रपटात नोंदविलेल्या हकीकतीची चिकित्सा करूया.

अनुक्रमणिका

शिवाजीमहाराजांचा मृत्यू झाल्या झाल्या पूर्ववृत्त नोंदविण्याची गरज का वाटली याचा खुलासा ढेरे यांनी केलेला नाही. पूर्ववृत्त नोंदविण्यासाठी जी मंडळी बसली त्यांची यादी त्यांनी ग्रंथात आरंभी दिली आहे. ही यादी इ.स. १६८१ साली बैठकीत बसलेल्यांची आहे असा ग्रह होतो. कारण, "(त्यांनी) शंभुवनदेवाला साक्षी करून पर्वताची आदी पाहिली." असे ताम्रपटात म्हटले आहे. या मुद्याचाही खुलासा ढेरे करीत नाहीत.

ज्याकाळी "येथे फक्त लिंगच होते; शिवालय नव्हते," (पृ. २५७) इथून पूर्ववृत्ताचा आरंभ होतो. मग, कोणी कोणी कोणती मंदिरे बांधली याचा तपशील येतो. याचा अर्थ असा की, जवळपास काही शतकांपूर्वीची हकीकत जमलेली मंडळी नोंदवीत आहेत. परंपरेने चालत आलेल्या आठवणींचा याला आधार असावा. कागदपत्रांचा आधार असणे एकंदरीतच अवघड दिसते. तत्कालीन रीत पाहता शिलालेख व ताम्रपट यांचा आधार अपेक्षित आहे. पण तो उपलब्ध नाही. तपशील इतके नेमके आहेत की आपण थक्क व्हावे. जुन्या कागदपत्रांचा नक्की आधार असावा असे ढेरे यांनी म्हणावे हे समजू शकते. त्यांचे म्हणणे आपण खरे धरून चालू.

जी 'भक्तजन' मंडळी जमल्याची नोंद आहे ती सर्व अकराव्या-बाराव्या शतकातील मानली तरी, ताम्रपटाचे लेखन १६८१ सालचे असूनही शिवछत्रपतींच्या भोसले घराण्याशी या मंडळींपैकी कोणाचा संबंध असल्याचे त्यात नमूद केलेले नाही. विशेषतः बळीयेपा गोपती शिरसाट यांचाही तसा काही संबंध असल्याचे नमूद केलेले नाही. ढेरे लिहितात, "यात (ताम्रपटात) बळियप्पाच्या नातेसंबंधांची नोंद इतकी सुसंगत आहे की, तिच्या आधारे आपले, यादव काळातील महनीय व्यक्तींविषयीचे पूर्वज्ञान अधिक समृद्ध होण्यासाठी आपणांस शोधाची नवी दिशा लाभेल. विशेषतः महाभिल्लम (सेऊण यादवांच्या घराण्यातील महापराक्रमी पाचवा भिल्लम) आणि त्याचा पुत्र यांच्याशी असलेला बळियप्पाचा निकटचा नातेसंबंध अत्यंत लक्षणीय आहे." (पृ. २६१) हे मान्य केले तरी, या बळीयप्पा गोपती शिरसाट याचा शिवछत्रपतींच्या भोसले घराण्याशी काही संबंध नसल्याचीच ती खूण नाही का? ताम्रपटाचे लेखन केले त्या आधी किमान पाऊणशे वर्षे तरी, म्हणजे मालोजीराजांच्या काळापासून, शिखर शिंगणापूरच्या शिवस्थानाशी भोसले घराण्याचे घनिष्ठ संबंध प्रस्थापित व शिष्टमान्य झालेले होते.

लिंगरूप वनदेवाच्या स्थानाचे रूपांतर अनेक मंदिरांचा पावित्र्यसंभार उभा करीत शिवस्थानामध्ये घडवून आणण्याचे काम सामान्य माणसांचे नव्हतेच. त्या प्रदेशात राज्य स्थापन करणाऱ्या, स्वतःस यादव म्हणविणाऱ्या सेऊण यादवांच्या परंपरेतील सम्राट महाभिल्लम व त्याचे संबंधी यांनी पुढाकार घेणे ही गोष्टही स्वाभाविक आहे. या ताम्रपटात ज्याचे नाव प्रामुख्याने येते तो बळीयेप्पा गोपती शिरसाट हा शिवछत्रपतींच्या भोसले कुळाचा आद्य पुरुष असल्याची नोंद हा ताम्रपट १६८१ साली पण करीत नाही, हे विसरता कामा नये.

स्मृतीचाच मुद्दा विचारात घ्यावयाचा तर, भोसले घराण्याच्या उत्कर्षाच्या आधीपासून स्वतःची खानदानी अस्मिता वागविणाऱ्या मातब्बर 'मराठा' सरदार वतनदार कुळांची स्मृती विचारात घ्यावयास हवी. शिवाजीमहाराजांनी आदिलशाही व मुघल बादशाही या दोन बलाढ्य शाह्यांशी मुकाबला करीत स्वतंत्र राज्याची निर्मिती करण्याची कामगिरी पार पाडल्यानंतरही त्यांचे घराणे क्षत्रिय नाही म्हणून त्यांचा राज्याभिषेकाचा अधिकार नाकारण्यासाठी पुढे आलेली मंडळी, चार एक पिढ्यांपूर्वी या भोसल्यांना कोणी खानदानी कुळ म्हणून ओळखतही नव्हते, असेच त्यांच्या स्मृतीच्या आधारे म्हणत होती.

राज्यासाठी अधिमान्यता प्राप्त करून घेण्यासाठी ब्राह्मण पुरोहितांकरवी अभिषिक्त होणे सामाजिक-राजकीयदृष्ट्या अत्यावश्यक होते ही गोष्ट ध्यानी घेऊन शिवाजीमहाराजांनी कवींद्र परमानंदांकरवी *शिवभारत* ग्रंथही संस्कृतमध्ये रचून घेतला; सिसोदिया या राजपूत घराण्याशी संबंध 'सिद्ध' करीत, ब्राह्मण पुरोहित गागाभट्ट यांच्या हस्ते राज्याभिषेकही करून घेतला. ढेरे म्हणतात त्याप्रमाणे, नंतरच्या काळात त्यांनी व त्यांच्या वंशजांनी – संभाजीराजे, राजाराममहाराज तसेच तंजावरकर भोसल्यांनीही – राजपूत संबंधाचा उल्लेखही केला नाही. यांच्यापैकी कोणीही होयसळ राजघराण्यापैकी आपण आहोत असेही कधी म्हटलेले दिसत नाही, ही वस्तुस्थिती ढेरे का स्वीकारू शकत नाहीत?

प्रत्यक्षात भोसल्यांच्या हाती राजसत्ता होती तोवर मातब्बर खानदानी मराठी कुळांनी ते वास्तव स्वीकारले, पण मनापासून भोसले घराण्याच्या क्षत्रियत्वास अधिमान्यता त्यांनी वा अनेक ब्राह्मण पुरोहितांनी दिलेली नव्हती, असे चित्र समोर येते. या वास्तवाचे भानही खुद्द शिवाजीमहाराजांना असावे, आणि म्हणूनच राजपूत-संबंधाचा पुनरुच्चार करण्याच्या भानगडीत ते पडले

नाहीत. स्वतःच्या खानदानी मराठा कुळीचा गर्व बाळगणारी मातब्बर सरदार मंडळी मुसलमानी राजवटीच्या चाकरीत कशी व किती धन्यता मानीत होती व धन व सत्ता यांच्या लोभाने कोणती कारस्थाने करावयास सदैव तत्पर असत ह्याचा पुरेपूर अनुभव त्यांच्या गाठीशी होताच.

भोसले हे राजपूत सिसोदिया घराण्याशी संबंधित नव्हते; ते होयसळ राजघराण्याशी संबंधित कुळही नव्हते; शिवाजी-महाराजांच्या आधी किमान सातआठ पिढ्यांपासून महाराष्ट्रात त्यांचे वास्तव्य होते; त्याआधीचा इतिहास आपल्याला आज तरी ज्ञात नाही, असे सरळ म्हणण्यास ढेरे यांना अडचण का वाटावी? भोसले हे क्षत्रिय की शूद्र हा वादच ढेऱ्यांनी सरळसरळ निकालात काढायला हवा होता. जो राज्य निर्माण करण्याची, राज्य चोखपणे व कार्यक्षमतेने चालविण्याची क्षमता व कर्तृत्व प्रकट करतो तो क्षत्रियत्व संपादतो, आणि तोच त्याच्या क्षत्रियत्वाचा पुरेसा पुरावा असतो. भारताच्या इतिहासात प्राचीन काळापर्यंत आपण मागे गेलो तरी हेच वास्तव असल्याचे आढळेल. पण चातुर्वर्ण्याची विचारप्रणाली (ideology) मनोमन मानणाऱ्या समाजातील लहानथोर, श्रेष्ठ-कनिष्ठ सर्वांचीच अडचण अशी होती की, सैनिकी पेशा, व्यापार अशा मार्गांनी धनदौलत वा सत्ता जरी संपादिली तरी, त्या गोष्टींना साजेसा दर्जा व मान्यता कोणत्या वर्णाचे, कोणत्या जातीचे, खानदानाचे तुम्ही असल्याचे समाजाकडून स्वीकृत आहे त्यावर अवलंबून असे.

किमान आज तरी आपण असे म्हणू या की, शिवाजी-महाराजांसारख्या अलौकिक कर्तृत्वाच्या व नैतिक उंचीच्या व्यक्तींना खानदानीपणाच्या कुबड्यांचा आधार देण्याचे कारण नाही.

शिखर शिंगणापूरचा शंभुमहादेव हा भोसले घराण्याचा मूळापासून कुलस्वामी होता हे सिद्ध करण्यालाही ढेरे यांनी अवास्तव महत्त्व द्यायला नको होते. त्यांचा ग्रंथ वाचल्यावर असे मत बनते की, शिवाचे क्षेत्र म्हणून मंदिरांसह शिखरक्षेत्री निर्मिती ज्यांनी केली त्यांचा शिवछत्रपतींच्या भोसले घराण्याशी संबंध नव्हता. नागर-ग्रामीण समाजातील प्रतिष्ठित थरांमध्ये मान्यता पावल्यानंतरच्या काळात, म्हणजे पंधराव्या शतकामध्ये उत्कर्ष पावत असलेल्या भोसले घराण्याने तुळजापूरची भवानी, शिखर शिंगणापूरचा शंभुमहादेव ही लोकदेवते कुलदेवते म्हणून स्वीकारली आणि मग पुढे त्या देवतांना राजाश्रयही दिला. ही दोन्ही दैवते लोकधर्मीय दैवतेच राहिली. दैवी चमत्कार करण्याची शक्ती बाळगणारी व प्रसंगी चमत्कार घडवूनही आणणारी दैवते कुलदैवते म्हणून स्वीकारण्याइतके लोकधर्मीय सश्रद्ध भक्तमानस भोसले घराण्यातील व्यक्तींचे होते. शिवाजीमहाराज विशेषच श्रद्धावान व वैराग्यशील पुरुष होते. सत्पुरुष म्हणून ज्यांचा ज्यांचा लौकिक होता अशा सर्वांविषयी पूज्यभाव शिवछत्रपती बाळगताना दिसतात, आणि या सत्पुरुषांचेही लक्ष शिवाजीमहाराजांच्या राज्यनिर्मितीच्या उद्योगाकडे होते.

"आपले राज्य हे 'श्रींचे राज्य' आहे; ते शंभुमहादेवाचे राज्य आहे — आई भवानीचे राज्य आहे, ही त्यांची प्रबळ आंतरिक श्रद्धा होती. हे राज्य व्हावे ही 'श्रींची इच्छा' आहे आणि हिंदवी स्वराज्याची निर्मिती करून 'श्री' ती इच्छा पूर्ण करणार आहेत, या अनन्यसाधारण विश्वासानेच त्यांनी देव मस्तकी धरून अवघा हलकल्लोळ केला होता. ते आपणास 'भवानीचा भोपा' मानीत असत." (पृ. ३४४-४५) ढेरे यांनी शिवाजीमहाराजांच्या थोरवीवर अचूक व नेमके बोट ठेवले आहे. *राइझ ऑफ द मराठा पॉवर* या त्यांच्या ग्रंथात न्यायमूर्ती रानडे यांनी शिवाजीमहाराजांची जी गुणवैशिष्ट्ये सांगितली, त्यांची थोरवी गायिली ती ढेरे यांनी उद्धृत केली आहे. न्या. रानडे म्हणतात, "ज्या समाजात व काळात शिवाजी जन्माला आला, त्या समाजाच्या व काळाच्या ज्या सर्वोत्तम आशा-आकांक्षा होत्या, त्यांची जाणीव आपल्या व्यक्तिमत्त्वात उभी करणारा असा तो पुरुष होता व त्यातच त्याचे खरे बळ साठविलेले होते.... स्वार्थत्यागाच्या पराकाष्ठेस पोचलेला ज्वलंत धर्माभिमान, माणसाच्याहून श्रेष्ठ असलेली उच्च दैवी शक्ती आपले व आपल्या कामगिरीचे संरक्षण करीत असल्याच्या (अढळ) विश्वासाने उद्‌भवलेली धाष्ट्याची व साहसाची वृत्ती, लोकांना एकत्र जुळवून त्यांना विजयाकडे नेणारी महापुरुषोचित आकर्षकता, काळाच्या खऱ्या गरजा अचूक ओळखणारी दुर्लभ अंतर्दृष्टी, कसल्याही विघ्नापुढे हार न खाणारी कृतसंकल्पा-संबंधातील चिकाटी, हिंदी किंवा युरोपियन इतिहासात विरळपणे आढळणारी प्रासंगिक तत्परता आणि योजकता, स्वकाळाच्या पुढे अतिदूर पाहाणारा असा खरा देशाभिमान, सदय न्यायबुद्धी — या गुणांत शिवाजीचे सामर्थ्य होते." (पृ. ३४७)

अशा अलौकिक थोर पुरुषाचे घराणे मुळात राजपूत होते याविषयी अप्रबुद्ध आग्रह केवळ कीव करण्याच्या लायकीचा. तसाच हे घराणे, दक्षिणेकडील का असेना, एका राजघराण्याची शाखा होते हेही अट्टाहासाने सिद्ध करण्याची गोष्ट हा देखील

अनुक्रमणिका

अप्रबुद्ध आग्रहच वाटतो. एक ना एका मार्गाने/उपायाने शिवाजीमहाराज हे 'सूर्यवंशी' आर्यांपैकीच होत — राजपूत नाहीतर यादव — हे म्हणता आले पाहिजे याबद्दलचा मान्यवर इतिहाससंशोधकांचा आग्रह हे वंशवादी (racist) दृष्टिकोण किती खोलवर रुजलाय याचे गमक आहे. ढेरे दक्षिण-संबंधावर भर देतात; नव्हे, तो त्यांचा एक मध्यवर्ती सिद्धांत आहे. आता, असे दिसते की, स्वतःस आर्य म्हणविणारे जे लोक इसवी पूर्वी तिसऱ्या सहस्रकात भारतीय उपखंडात स्थलांतरित झाले ते स्वतःला आग्रहपूर्वक 'सूर्यवंशी' म्हणविणारे होते. या उलट, ज्यांना आपण द्राविडभाषिक जनसमूह म्हणतो ते चंद्रवंशी होते. जर भोसले आणि इतर मातब्बर मराठी कुळे ही 'दक्षिणेकडून आलेली' असली तर ती 'चंद्रवंशीय' असणार, त्यांची भाषा संस्कृतही नसणार, वा ती इंडो-आर्यन कुलातीलही नसणार. मग असे म्हणायला हवे की, मुळात पशुपालक वा आदिवासी जनसमूहातून आलेली घराणी जेव्हा सत्ता व धनदौलत या बाबतीत उत्कर्ष पावत तेव्हा, आपण यादवकुलीन आहोत, आपण क्षत्रिय आहोत, आपण संस्कृत भाषेचे अभिमानी आहोत, आपण सूर्यवंशी व आर्य आहोत हे म्हणत, तसे दाखवीत. आपल्याच स्वकीय जनसमूहांपासून अंतर ठळकपणे वाढविणे व प्रस्थापित करणे हा एक कार्यक्रमच बने. शहाजीराजे, शिवाजी महाराज, संभाजीराजे इत्यादींनी ब्राह्मण कवी-पंडित दरबारी बाळगले, त्यांच्याकडून संस्कृत रचना करवून घेतल्या, शिलालेखांमध्ये संस्कृत भाषा वापरली वगैरे गोष्टी भोसले घराणेही राज्य स्थापण्याच्या जवळ पोचू लागले (व राज्यकर्ते बनले) तसे याच गोष्टी करत असल्याचे दृष्टोत्पत्तीस येते ही अर्थपूर्ण गोष्ट आहे.

ज्या व्यक्तीला वा घराण्याला राज्य स्थापन करावयाचे असेल त्या व्यक्तीला (घराण्याला) या वाटेने मार्गक्रमण करण्याखेरीज गत्यंतर नव्हते. पण लक्षात घ्यायला हवेत असे इतरही पैलू आहेत. भारतभर पसरलेल्या व प्रस्थापित झालेल्या मुसलमानी राजवटींचे मानगुटीवरील जोखड फेकून देता येण्यासाठी, स्वतःच्या ठायी आत्मबल व धैर्य उत्पन्न करण्यासाठी एका अस्मितेची जोपासना करणे ही प्राथमिक व प्राणभूत गरज होती. 'हिंदू' या संज्ञेभोवतीच ती करता येणार होती, कारण सर्व भारतभर आव्हान मुसलमान राजवटींचे होते. या राजवटी धर्माभिमानी तर होत्याच पण स्वतःचा इस्लाम धर्म हा श्रेष्ठतम व एकमेव खरा धर्म आहे आणि धर्मप्रसार हे आपले एक कर्तव्य आहे असे औपचारिक पातळीवर मानीत होत्या. अखिल भारतीय पातळीवर 'हिंदुधर्म' अशी एकजिनसी, घट्टपणे संघटित व प्रस्थापित अशी गोष्ट नव्हती. लोकधर्मीय पातळीवरून या विशिष्ट आव्हानाला झेलता येणार नव्हते.

मुघल बादशाहीच्या क्षेत्रात 'दिने इलाही' हा एक स्वतंत्र, नवा धर्मच स्वतःच्या अधिकारबळावर प्रसृत करण्याचे पाऊल उचलून सम्राट अकबराने या पेचातून मार्ग काढण्याचा केलेला प्रयत्न निष्फळ ठरला. दोन्हीकडच्या धर्मगुरू, शास्त्री-पंडित, मुल्ला-मोलवी यांना ही गोष्ट मान्य नव्हती आणि सामान्य लोकांना हा पेच काय ते कळणे शक्य नव्हते. शिवाजीमहाराजांनी 'हिंदू धर्माभिमाना'च्या पायावर स्वराज्य संस्थापनेचे उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवले. भारतातील जनसामान्य मुसलमानांविषयी त्यांच्या मनात व धोरणे-कृतींमध्ये द्वेषमूलक कट्टर भाव आढळत नाही. मुसलमानी राजवटी येथून हटवायच्या याविषयी मात्र ते ठाम होते.

लोकधर्मीय भूमिकेतून व अंगाने 'हिंदुधर्मा'ची मांडणी अशक्यच होती (व आजही आहे). अशी मांडणी, दुर्दैवाने, संस्कृत भाषेला अग्रस्थान देत, महत्त्व देत, ब्राह्मण शास्त्री-पंडित-कवी यांच्या आधारेच होऊ शकत होती. आपले दुर्भाग्य असे की, लोकधर्मांचा, संस्कृतींचा, त्यांच्या भाषांचा आणि खुद्द जनांचा (folk) अधिक्षेप करूनच, त्यांना दडपून टाकीत व स्वतःचा बडेजाव वाढवीतच ही ब्राह्मण मंडळी हे काम करणार हे विधिलिखित होते. कारण धनदौलत व सत्ता यांची कांक्षा बाळगणाऱ्या, राजा-सम्राट यांचे पुरोहितपण करणाऱ्या, त्यांच्या आश्रयाने शास्त्री-पंडित-कवी म्हणून कार्य करणाऱ्या ब्राह्मणांची एक प्रदीर्घ परंपरा चालत आलेलीच होती.

'मध्ययुगा'त चातुर्वर्ण्य, जातपात, अस्पृश्य व स्त्रिया यांचे दमन यांविरूद्ध माणुसकी, समता, न्याय ही मूल्ये रुजवण्यासाठी आयुष्य समर्पित करणारे संत भारतभर उत्पन्न झाले व त्यांनी लोकमानस व संस्कृती यांना उन्नत आकार दिला. पण याच काळात हिंदू राज्यसत्तांच्या आधारे 'ब्रह्म-छत्र संयोगा'द्वारे लोकधर्मांच्या मुळावर येत जो उच्च-धर्म (High Religion) प्रस्थापित झाला त्यामधून चातुर्वर्ण्य, जातपात, अस्पृश्यता, स्त्रियांचे दमन अशा गोष्टींची पकड समाजव्यवहारात व लोकमानसावर अधिक सर्वंकष स्वरूपात प्रस्थापित झाल्याचे आढळते. राजकारणी हितसंबंधांमधून संस्कृत भाषेचा वाढता बडेजाव, ब्राह्मणांचे प्रभुत्व, आणि आर्यत्व, क्षत्रियत्व

यांना प्राप्त झालेले महत्त्व ही या अनिष्ट स्थित्यंतराची गमके होत.

चातुर्वर्ण्याच्या विचारप्रणालीची पकड किती खोलवर होती, आणि याचा परिणाम म्हणून राजकारण-समाजकारणाला किती विघातक वळण मिळाले याचे महाराष्ट्रात एकेकाळी गाजलेले 'वेदोक्त प्रकरण' हे फार उद्‌बोधक उदाहरण आहे. प्रत्यक्षात जी भूमिका/कार्य (role) व्यक्ती पार पाडीत असे त्यानुसार ती 'क्षत्रिय' आहे की नाही हे ठरते, तिची कुळी कोणत्या वर्णाची हे पाहून याचा निर्णय होत नाही; शाहूछत्रपती राजे आहेत तर ते क्षत्रिय आहेतच आहेत, असे म्हणत चातुर्वर्ण्याच्या मुद्यावरून पारंपरिक सनातनी भूमिका उखडून टाकणारे समाजकारण टिळकांनी केले नाही; ते तसे करू शकले असते. पण, दुसऱ्या बाजूला, शाहू छत्रपतींनीही महात्मा फुले यांच्या बंडखोर भूमिकेचा अंगिकार केला नाही. तेही चातुर्वर्ण्याच्या खोड्यात तेवढेच अडकलेले राहिले. 'क्षात्रजगद्‌गुरू' स्थान त्यांनी निर्माण केले. महाराष्ट्रातल्या दीर्घकाळ चाललेल्या ब्राह्मण-ब्राह्मणेतर राजकारणामधून चातुर्वर्ण्य विचारप्रणालीच अधिक बळकट झाली; तिचे निर्मूलन झाले नाही.

ढेरेदेखील, इतक्या पुढच्या काळातही, या ग्रंथातील विषयाच्या प्रतिपादनाच्या संदर्भात या खोड्यामधून स्वतःची मुक्तता साधू शकलेले नाहीत. त्यांनी सादर केलेले पुरावे भोसले घराण्याचा उत्तरेतील राजपूतांशी आणि सिसोदिया कुळाशी काही संबंध जोडता येत नाही हे निर्विवाद सिद्ध करतात. त्याचवेळी, होयसळ राजघराण्याशी भोसले घराण्याचा संबंध प्रस्थापित करणारा कोणताच पुरावा ते सादर करू शकलेले नाहीत. भोसले कुळाचा आद्य पुरुष बळीप होता, तो गवळी — म्हणजे मूळ यादव—क्षत्रिय होता, आणि तो मोठा राजा होता, हे स्वतःचे म्हणणेही ऐतिहासिक प्रमाणांनी सिद्ध करण्यात ते यशस्वी झालेले नाहीत. ते गवळी कुळ होते का, ते यादव कुळ होते का, याचा शोध लागत नाही, पण त्याला काही महत्त्व नाही; या कुळात मालोजीराजे-शहाजीराजे अशी कर्तृत्ववान माणसे निपजली, आणि शहाजीराजांच्या पोटी तर अलौकिक थोरवी व कर्तृत्व प्रकट करणारे शिवाजीमहाराज निपजले; आणि एवढे पुरेसे आहे, असे काही ढेरे म्हणू शकले नाहीत, याचा मोठा खेद होतो.

– २ –

ढेरे यांचे प्रतिपादन असे आहे की, "बळियप्पामुळे संपूर्ण दक्षिणेच्या इतिहासाचा नवा बोध घडविण्याच्या दिशा उजळल्या आहेत." (पृ. २८२) ग्रंथाच्या आरंभीच या त्यांच्या प्रतिपादनाचे सूचन मिळते : "शिखर शिंगणापूर हे शंभुमहादेवाचे क्षेत्रस्थान ज्या प्रदेशात आहे, त्या प्रदेशाचे सामाजिक पर्यावरण गेल्या अनेक शतकांपासून गवळी-धनगर या पशुपालक समाजांच्या संचाराने आणि वास्तव्याने भरले-भारलेले आहे, हे सामाजिक सर्वेक्षणातून तसेच ऐतिहासिक व वाङ्मयीन पुराव्यांच्या परीक्षणातून स्पष्ट झालेले आहे." (पृ. २) शिवछत्रपतींच्या भोसलेकुलाने शिखर शिंगणापूर या देवस्थानाच्या निर्मितीमध्ये विशेष कामगिरी बजावली असल्याचे प्रमाण ढेरे यांना 'शिंगणापूर ताम्रपटा'मध्ये मिळते. ते लिहितात, "सेऊण देशाचे यादव कुल आणि बळीयप्पा ज्या घराण्यातला होता ते कर्नाटकातले यादव कुल यांचा सोयरसंबंध असल्याची नोंद आपण शिंगणापूर ताम्रपटात पाहिली आहे." (पृ. २८२)

सेऊण यादव हे मूळचे सौराष्ट्रातील द्वारकेचे, तिथून ते काही कारणाने दक्षिणेत स्थलांतरित झाले, म्हणजेच ते मूळ मथुरानिवासी यदुवंशीय, असा दावा केला गेला आहे. या दाव्यात तथ्य असण्याची शक्यता नाकारावयाचे कारण नाही, पण हे स्थलांतर कधी, कोठे व कोणत्या कारणाने घडले, घडले तरी का, हे ऐतिहासिक पुराव्याच्या आधारे सांगता येत नाही, असे प्रा. ए.एस. आळतेकर यांनी म्हटले आहे. त्यांचा अभिप्राय त्यांनी असा नोंदवला आहे : 'We may therefore most probably presume that the *Yadava* family was in fact an indigenous *Maratha* sept, which on rising to political eminence, began to profess a descent from Yadu and to claim to have emigrated from Dwaraka in Kathiawar.'[१]

नवव्या शतकात काही यादव (मांडलिक) घराणी उत्तर कर्नाटकातील धारवाड परिसरात राज्य करीत असल्याचे आढळते, पण ही घराणी मूळची कर्नाटकातली यादव घराणी असल्याचे म्हणता येत नाही; नंतरच्या काळात मंत्रिपदे भूषविणाऱ्या या कुळांमधील व्यक्तींची नावे कानडी वळणाची असल्याचे आढळते.

१. 'The Yadavas of Seundesa' in *The Early History of the Deccan*, parts VII-XI. Ed. G. Yazdani. Oxford University Press, 1960. पृ. ५१६.

तरी ही घराणी मूळ कर्नाटकीय यादव घराणी होती असे म्हणता येत नाही, असे आळतेकरांनी म्हटले आहे. होयसळ राजघराणेही आपण मुळातले यदुवंशीय असल्याचा दावा करते, याचीही नोंद आळतेकरांनी घेतली आहे. सेऊण यादव हे बहुधा मुळात महाराष्ट्रातल्या गोदावरी-भीमा नद्यांच्या खोऱ्याच्या प्रदेशातील असावेत; आणि सत्ताधारी राजघराणे म्हणून उत्कर्ष पावल्यावर आपण यदुवंशातले आहोत, व द्वारकेहून कोण्याकाळी स्थलांतरित झालो, असा दावा त्यांनी केला, हे प्रा. आळतेकरांचे म्हणणे खरे असण्याची शक्यता जास्त.

आता, उत्तर कर्नाटकात धारवाड भागात लहान राज्ये असलेल्या ९व्या शतकातील घराण्यांचा, ती मूळात क्षत्रिय-यादव घराणी असल्याचा दावाही प्रा. आळतेकरांनी अमान्य केला आहे, आणि ते त्यांचे म्हणणेदेखील खरे असण्याची शक्यता जास्त आहे.

आळतेकरांचे हे म्हणणे ढेरे यांच्या प्रतिपादनाची तसे पुष्टीच करणारे आहे. देवगिरीचे यादव सोमवंशीय, तर होयसळचे राजघराणे आपण सूर्यवंशी यादव असल्याचा दावा करतात, याचे स्पष्टीकरण देताना ढेरे लिहितात, "ही विसंगती क्षत्रिय प्रतिष्ठेसाठी, राजपदाला जनसमर्थन प्राप्त करण्यासाठी विक्रमशाली गोपजनांनी नव्याने यादव ठरण्याच्या प्रक्रियेतून आलेली आहे." (पृ. ३३७)

भोसलेकुळाचा मूळ पुरुष बळियप्पा गोपती शिरसाट होता हे एक ऐतिहासिक तथ्य म्हणून 'शिंगणापूर ताम्रपटा'च्या आधारे निर्विवादपणे, निःशंक स्वरूपात सिद्ध होते असे ढेरे यांनी म्हटले आहे, तेही पटण्यासारखे नाही. या ताम्रपटात नमूद केलेला 'कुन्हा भिल्लम महाभिल्लम जाधव' हा महापराक्रमी यादव सम्राट भिल्लम पाचवा होय हे म्हणता येण्यासाठी आणखी काही पुरावा/आधार हवा. मुळात, ताम्रपटात ज्या सर्वांचा आरंभी निर्देश आहे ती, 'पूर्ववृत्त' नोंदविण्यासाठी जमलेली मंडळी सतराव्या शतकातली की बाराव्या शतकातली, हा प्रश्न आहे. ती सतराव्या शतकातली नसून बाराव्या शतकातली असली तर सम्राट भिल्लम पाचवा याचा उल्लेख एका सर्वसाधारण व्यक्तीसारखा कसा — 'जाधव' असे आडनाव लावून — हा प्रश्नही आहे. तसेच, ताम्रपटातील नोंदीमधून जमलेल्या मंडळींमधील बळियेप्पा गोपती शिरसाट नावाच्या व्यक्तीचे 'महाभिल्लम जाधव' या व्यक्तीशी असलेले नाते कळते, पण हा बळियेप्पा हाच शिवछत्रपतींच्या भोसले कुळाचा आद्य पुरुष असल्याचे सिद्ध होत नाही. या ताम्रपटासंदर्भात अनेक प्रश्न उपस्थित होतात. शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर लगेच पुढच्या वर्षी 'पूर्ववृत्त' नोंदविण्याची — तीही ताम्रपटाच्या स्वरूपात — गरज का उत्पन्न झाली? त्यावेळपावेतो भोसल्यांचा कुलस्वामी म्हणून शंभुमहादेवाची प्रतिष्ठा, तसेच शिखर शिंगणापूरच्या देवस्थानावर भोसले घराण्याचे प्रभुत्व व नियंत्रण या गोष्टीही प्रस्थापित झाल्या होता. तर मग, छत्रपतींच्या आदेशाशिवायच हे पूर्ववृत्त नोंदवले गेले की आदेशावरून, आणि कोणत्या हेतूने? होयसळ राजघराण्याचा उत्कर्ष-अस्त याचा इतिहास लिहिणाऱ्या जे. डंकन एम. डेरेट यांनी असे नमूद केले आहे की, "Between about A.D. 400 and A.D. 1600 more than 50,000 records in Tamil, Kannada, Telgu and Sanskrit were set up to furnish the researcher with a mine of information of the lives and manners of the inhabitants of South India in a fulness that cannot be rivalled in southern Asia and is hardly exceeded anywhere."[२] तर मग शिखर शिंगणापूर येथे प्रथमच देवळांची व अन्य वास्तूंची निर्मिती केल्याची नोंद कोरीव लेखांच्या रूपात का केली गेली नाही? देवगिरीचे यादव, द्वारसमुद्रचे होयसळ वा तत्सम कोणतेच प्रतिष्ठित व बलशाली राजघराणे/घराणी शिखर शिंगणापूर या क्षेत्राच्या ठिकाणी केल्या गेलेल्या बांधकामांमध्ये सहभागी नव्हती असा याचा अर्थ करता येऊ शकेल. थोडक्यात "बळियप्पामुळे संपूर्ण दक्षिणेच्या इतिहासाचा नवा बोध घडविण्याच्या दिशा उजळल्या आहेत." हे त्यांचे म्हणणे ढेरे खरे करू शकलेले नाहीत, असे मोठ्या खेदाने म्हणावे लागते.

वस्तुस्थिती अशी आहे की, इतिहासात फार मागे जाऊन भोसल्यांच्या कुळाचा शोध घेता येत नाही. "भोसले घराण्यातील पुरातन-पुरुषांच्या अनेक समाध्या देवगिरीच्या परिसरात वेरूळ येथे आहेत... आणि वेरूळ भागातच त्यांची पहिली-वहिली पाटिलकीची वतने आहेत." "ते (भोसले) शिवोपासक असल्यामुळे घृष्णेश्वराविषयी त्यांच्या ठायी नितांत श्रद्धा वसत होती.... तरी बाबाजीराजांपर्यंतच्या पिढ्यांची प्रमाणे आज उपलब्ध नाहीत." (पृ. २८२) इतकेच खात्रीपूर्वक म्हणता येते.

२. *The Hoysalas*. Oxford University Press. Madras. 1957. Page 206.



अनुक्रमणिका

शिवाजीमहाराजांना राज्याभिषेक करून घेण्याची आवश्यकता उत्पन्न झाली तेव्हा त्यांना राज्यभिषेक करवून घेण्याचा अधिकार नाही, कारण ते क्षत्रिय नव्हेत, असे तत्कालीन मातब्बर व प्रतिष्ठित मराठा सरदार घराण्यांचे म्हणणे होते असे दिसते. त्यांना अभिषिक्त करण्यास, त्या विधींचे पौरोहित्य करण्यास महाराष्ट्रातील प्रतिष्ठित ब्राह्मण पुरोहित घराणीही पुढे येईनात याचेही एक कारण तरी मातब्बर मराठा सरदार घराण्यांची एतद्‌विषयक भूमिका हे राहिले असले पाहिजे. या मातब्बर मराठा घराण्यांकडून मान्यता मिळविण्याची तर निकड होती. रजपूत कुळाशी संबंध प्रस्थापित करूनच ही मान्यता मिळेल हे स्पष्ट होते. दक्षिणेत कोणत्याच घराण्याला 'क्षत्रिय' म्हणून आवश्यक ती मान्यता व प्रतिष्ठा सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात उरलेली नव्हती. तुलनेने काही रजपूत घराण्यांना क्षत्रिय म्हणून मुघल बादशाहीचीही मान्यता होती. शिवाजी महाराजांनी रजपूतसंबंध जोडून कार्यभाग साधून घेतला, पण त्यांना रजपूत घराण्यांविषयीचीही वस्तुस्थिती पक्की माहीत असावी. कर्तृत्वाने, अधिकाराने आपल्या जवळपासही न येणाऱ्या या तथाकथित क्षत्रिय राजकुळांचे शिवाजीमहाराजांनी व त्यांच्या पुत्रांनी पुनःपुन्हा स्मरण करावे असे काही नव्हतेच.

तेव्हा, 'रजपूतसंबंध' नाकारण्याच्या बाबतीत आपण ढेरे यांच्या पक्षाचे असलो तरी, दक्षिणेकडील कोणत्याही राजघराण्याशी भोसले कुळाचा संबंध जोडता येण्यासाठी त्यांना आवश्यक तो पुरावा मिळालेला नाही, असेही म्हणावे लागते.

भोसले कुळाचा विषय बाजूला ठेवून मात्र दक्षिण भारताच्या इतिहासाकडे नव्याने पाहण्याचे त्यांनी जे महत्त्व प्रतिपादिलेले आहे ते उरते.

या विषयाचा विचार करताना आरंभीच एक गोष्ट ध्यानात येते ती अशी की, विंध्याचलाच्या दक्षिणेच्या सर्व प्रदेशाचा विचार 'दख्खन'चेही काही विभाग पाडून करावा लागतो. गवळी-धनगर या पशुपालक समाजांच्या संचाराने आणि वास्तव्याने भरला-भारलेला प्रदेश हा किनारपट्टीच्या प्रदेशापासून वेगळा करावा लागतो, आणि उत्तर महाराष्ट्र व विदर्भ यांच्यापासूनही वेगळा काढावा लागतो. यज्दानींनी संपादित केलेल्या *'दि अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन'* या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडात त्यांनी प्राचीन दक्षिणापथाचा नकाशा छापला आहे. तो पाहिल्यास ढेरे यांनी ज्या भागावर लक्ष केंद्रित केले आहे तो भाग मुख्यतः दख्खनच्या पठाराचा आजच्या आंध्र व कर्नाटक राज्यातला भाग असल्याचे लक्षात येते. यामध्ये दक्षिण महाराष्ट्राचा समावेश देखील करायला हवा. आपण दक्षिण भारताच्या नकाशाकडे पाहिले तर, ज्यांना आपण आज आदिवासी जमाती म्हणतो त्यांचे वास्तव्य फार मोठ्या प्रदेशामध्ये आढळते. याचा मोठा भाग 'दंडकारण्य' या नावाने आपणास परिचित आहे. पण याच्या जोडीला 'पश्चिम घाट', 'पूर्व घाट' या नावाने ओळखला जाणारा डोंगर व अरण्य प्रदेशही विभिन्न आदिवासी जनसमूहांच्या वास्तव्याचाच प्रदेश आहे असे लक्षात येईल. 'गवळी-धनगर' पशुपालक समाजांमध्ये या सर्वांचा समावेश करणे योग्य, म्हणजे वास्तवाला धरून होणार नाही.

यज्दानी-संपादित वर निर्दिष्ट केलेल्या ग्रंथाच्या पहिल्या खंडात हेमचंद्र रायचौधरी यांचा 'जिऑग्रॉफी ऑफ दि डेक्कन' हा निबंध समाविष्ट आहे. प्राचीन वाङ्मयात दक्षिणापथातील ज्या जनपदांचा उल्लेख आहे त्यांपैकी विदर्भ, वत्सगुल्म, भोगवर्धन, मूलक, अश्मक, ऋषिक (असिक), महाराष्ट्र ही जनपदे यांचा एक वेगळा विभाग पडतो असे म्हणता येते. प्रा. र.म. भुसारी यांच्या *आद्य महाराष्ट्र आणि सातवाहन काल*[3] या ग्रंथात महाराष्ट्रातील प्राचीन जनपदांविषयी एका प्रकरणात त्यांनी विवेचन केले आहे. दंडकारण्य, नासिक्य यांचा त्यांनी वेगळा उल्लेख केला आहे. 'महाराष्ट्र' या जनपदाविषयी प्रा. रायचौधरी यांनी लिहिले आहे ते ध्यानात घेण्यासारखे आहे : "It is obvious that the early Hindu geographers used the name Maharashtra in a very restricted sense." प्रवरा नदीच्या खोऱ्यापासून ते कृष्णा नदीच्या उगमाजवळच्या प्रदेशापर्यंतच्या 'देशावरील' प्रदेशाचा समावेश तेवढा 'महाराष्ट्र'मध्ये केला जात असावा असे ते म्हणतात. कऱ्हाडचा (प्राचीन काळचे 'करहाटक') महाराष्ट्रात समावेश केला जात होता का याबद्दल खात्रीपूर्वक सांगता येत नाही, असेही त्यांनी म्हटले आहे. गोदावरी नदीच्या उगमाकडील खोऱ्याचा प्रदेश (the upper valley of the Godavari), ज्या प्रदेशात दंडक व नासिक्य हे जन वास करीत होते, त्या प्रदेशाचा समावेशही 'महाराष्ट्रा'त होत असावा.

आता, वर ज्या जनपदांचा उल्लेख केला आहे त्यांचा समावेश असलेल्या, गोदावरी, प्रवरा व भीमा-नीरा, कृष्णा या

३. प्रकाशक : मराठी साहित्य परिषद, आंध्रप्रदेश, हैदराबाद, १९७९, पृ. ३८-४५.

अनुक्रमणिका

नद्यांच्या खोऱ्यांतील प्रदेशांमध्ये जे जन राहात होते ते ढेरे यांना अभिप्रेत असलेल्या गवळी-धनगर समाजांपेक्षा वेगळे असावेत. असे दिसते की, विदर्भासह या सर्व प्रदेशातील लोकांचा भाषिक-सांस्कृतिक-राजकीयदृष्ट्या विंध्याचलापलीकडील लोकांशी व राज्यांशी प्राचीन काळापासून घनिष्ठ संबंध होता. आणि हा संबंध किमान सिंधू संस्कृतीच्या काळापासूनच होता असेही म्हणावयास जागा आहे.

शेतीच्या आधारे गावांची निर्मिती व ग्रामाधिष्ठित नागर समाज व संस्कृती यांचा उदय 'महाराष्ट्र'देशी सम्राट अशोकाच्या पूर्वकाळी झाला असला पाहिजे. सातवाहन, वाकाटक व कलचुरि यांच्या राजवटींच्या काळात व्यापारही भरभराटीत आल्याचे आपणास माहीत आहे. मुद्दा असा की, तत्कालीन 'महाराष्ट्र'देशी पशुपालक समाजही या प्रदेशात असतील, पण तो मध्यवर्ती वा राज्यकर्ता समाज होता या निष्कर्षाप्रत येता येत नाही.

ढेरे यांनी जो विषय मांडलेला आहे त्या संदर्भात *कलचुरि नृपति आणि त्यांचा काल*[४] या त्यांच्या ग्रंथातील महामहोपाध्याय वा.वि. मिराशी यांचे पुढील विधान महत्त्वाचे ठरते. ते म्हणतात, "या वंशातील बहुतेक राजे शैव किंवा पाशुपत पंथाचे अनुयायी होते. त्यांच्या लोकोत्तर औदार्यामुळे या पंथाचा सार्वत्रिक प्रसार झाला व जनतेच्या धार्मिक मताला एक विशिष्ट वळण लागले." (पृ. १)

या साऱ्या पार्श्वभूमीवर भोसलेकुळाचे वेरूळच्या परिसरातले आरंभीचे दीर्घकाळचे वास्तव्य सहज समजण्यासारखे आहे. अशा अनेक घराण्यांचे पुरातनकालीन पूर्वज मूळचे कोण-कुठले त्यांचा शोध घेण्याची खरोखर गरज ती कोणती? जर ठोस पुरावे (मौखिक परंपरांच्या स्वरूपात का होईना) हाती आले तर त्यांच्या आधारे जरूर तर्क करावा. भोसलेकुल शिवोपासक होते याचाही खुलासा स्वाभाविकपणे होऊ शकतो.

शिखर शिंगणापूर हे शिवस्थान श्रीशैलमल्लिकार्जुनाचेच महाराष्ट्रात बुद्ध्या निर्माण केलेले ठाणे आहे का हा प्रश्न व अनुषंगिक मुद्दे राहतात. याही बाबतीत चक्रधरांच्या आधीच्या काळापासून या ठिकाणच्या शिवस्थानाची ख्याती होती आणि 'महाराष्ट्र'देशीच्या अगणित लोकांचे ते मोठे श्रद्धास्थान होते असे नक्कीच म्हणता येते. पण या संदर्भातही एक पेच उपस्थित आहे. ढेरे यांच्या म्हणण्यानुसारच, बाराव्या शतकापूर्वी शिखर शिंगणापूर येथे देवालये नव्हती; तेथील शंभुमहादेव हा 'वनदेव' होता, आणि त्याच्या संबंधात हिवंजा कोळी-वळीप गवळी यांची एक चमत्कारांनी परिपूर्ण अशी लोककथा भाविकांमध्ये श्रद्धापूर्वक स्वीकारली गेली होती. त्यांनीच दिलेल्या तपशीलांवरून असे म्हणता येते की, बहुधा, मूळात (आजच्या भाषेतील) कोळी या आदिवासी जमातीच्या लोकांचे वनदेवत असलेले हे स्थान काही एका प्रक्रियेद्वारा कोळी व गवळी-धनगर या उभय समाजांचे श्रद्धाकेंद्र बनले. या प्रदेशात स्वतःच्या कर्तृत्वाने राजकीय उत्कर्ष साधलेल्या राज्यकर्त्या वर्गातील घराण्यांनी या वनदेवाचे अधिक प्रतिष्ठासंपन्न शिवाच्या रूपात उन्नत रूपांतर घडवून आणले आणि तेथे अनेक मंदिरांची उभारणी केली. 'शिंगणापूर ताम्रपटा'त नोंदवलेले जे पूर्ववृत्त आहे त्यावेळेपावेतो ब्राह्मणांचा प्रवेश कोणत्याच भूमिकेत झालेला नव्हता. हिवंजा कोळी व बळीप गवळी यांच्या कथेतही उईल शर्मा हे ब्राह्मण पात्र प्रविष्ट झालेले नव्हते. बाराव्या शतकात हे रूपांतर जेव्हा घडले तेव्हा शिवछत्रपतींचे भोसले घराणे वेरूळच्या परिसरात होते व नामवंत मातब्बर घराणे बनलेले नव्हते. बाराव्या शतकात (वा त्या आसपास) ज्या मंडळींनी पुढाकार घेऊन शिवालयांची निर्मिती केली त्यांना दक्षिणेतील श्रीशैल पर्वतावरील मल्लिकार्जुनाच्या क्षेत्राच्या माहात्म्याचा परिचय झालेला असणे शक्य आहे. मालोजीराजे भोसले आणि नंतर शहाजीराजे यांच्या काळी त्यांनी शिखर शिंगणापूरचा शंभुमहादेव याची त्यांचा कुलस्वामी म्हणून प्रतिष्ठापना केली तेव्हा आणखी एक स्थित्यंतर घडून आले असले पाहिजे. कोळी व गवळी यांना गौणत्व देणाऱ्या, खानदानी मराठा ही अस्मिता बाळगणाऱ्या समाजाचे प्रभुत्व या स्थित्यंतरामधून प्रस्थापित झाले का? मग पौरोहित्य कर्मात ब्राह्मणांचा शिरकाव झाला का? महाराष्ट्रातल्या कोळी, गवळी व अन्य बहुजनांहून वेगळी, श्रेष्ठत्व ठसविणारी, वंशवादी वळणाची 'शुद्ध', खानदानी मराठा कुळांची अस्मिता निर्माण होण्याचा व जोपासली जाण्याचा काळ कोणता? श्रीशैल क्षेत्राच्या शिवस्थानाचे राजकीयदृष्ट्या महत्त्व चालुक्यांच्या, वरंगळच्या काकतीयांच्या राजवटीच्या काळात प्रस्थापित झाले का? असेही काही प्रश्न मनात येतात. प्रथमतः शिखर शिंगणापूरला शिवालये बांधली गेली ती ज्या मातब्बर व्यक्तींच्या, कुळांच्या पुढाकाराने बांधली गेली त्यांचा शिवछत्रपतींच्या भोसलेकुळाशी काही संबंध असल्याचे आढळत नाही. तो रत्नागिरी जिल्ह्याच्या खेड

४. प्रकाशक : शासन साहित्य परिषद, मध्यप्रदेश (सूचना व प्रकाशन संचालनातर्फे), १९५६.

तालुक्यातील सह्याद्रीच्या पश्चिम उतारावरील सात गावांतील शिरसाट-भोसले ह्यांचा असण्याची शक्यता अधिक. शिंगणापूर ताम्रपटातही 'बळियेप्पा गोपती शिरसाट' असा उल्लेख आहे.

"मालोजी-विठोजींनी घृष्णेश्वराचे मंदिर पुन्हा उभारले" (पृ. २८२) असेल तर निजामशाहीच्या काळात ही गोष्ट घडली असणार — सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात. सामान्य स्थितीमधून म्हणजे पाटीलकीच्या वतनांच्या पातळीवरून वरच्या पायऱ्यांवर उत्कर्ष पावल्यावरही काही काळ भोसलेकुळ हे वेरूळच्या परिसरातच आपले स्थान अधिक प्रतिष्ठित करण्यात गुंतलेले असणार. मालोजीराजांनी शिखर शिंगणापूर येथे तळ्याचे बांधकाम केले त्यावेळी त्यांचे घराणे पुष्कळ अधिक मातब्बर झालेले होते. इतिहाससंशोधक ग.ह. खरे यांनी लिहिले आहे की, "भोसल्यांचे जुनें कुलदैवत म्हणजे वेरूळचा घृष्णेश्वर. मालोजीचा फलटणच्या निंबाळकरांशी नात्याचा संबंध आल्यावर भोसल्यांचे कुलदैवत सातारा जिल्ह्यातील माण तालुक्यातील शिखर शिंगणापूरचा शंभुमहादेव हे बनले...." (पृ. ९७) यावर ढेऱ्यांची टीका अशी की, "कुलदैवतांत इतक्या सहज बदल होत नसतो.... दूरवर स्थलांतरित झालेली घराणीही आपल्या कुलदैवताची स्मृती दहा-दहा पिढ्यांतही सुरक्षित ठेवतात..." (पृ. ९८) वस्तुस्थिती अशी दिसते की, मालोजीराजांच्या मागील एक-दोन पिढ्यांपलिकडे भोसल्यांची पूर्वजांविषयीही जितीजागती स्मृती दिसत नाही. प्रथमपासूनच शिखर शिंगणापूरचा शंभुमहादेव हेच भोसल्यांचे कुलदैवत होते, व त्याही आधी श्रीशैल क्षेत्रीचा मल्लिकार्जुन हे होते असे साधार म्हणता येते का? तर, नाही. असे दिसते की, राजकीय उत्कर्ष पावत चाललेले, पूर्वीपासूनच्या मातब्बर खानदानी कुळांशी सोयरसंबंध जोडू शकण्याची पात्रता स्वकर्तृत्वाने संपादित करीत चाललेले हे घराणे होते. नीरा नदीच्या परिसरातील हा माहात्म्यप्राप्त शंभुमहादेव हे कुलदैवत म्हणून स्वीकारणे ही एक, स्वतःच्या श्रद्धेशी प्रतारणा न करता राजकीय प्रभुत्व, प्रतिष्ठा व अधिमान्यता यांच्या दृष्टीने केलेली चाल म्हणता येईल. राज्यसंस्थापनेची कांक्षा बाळगणारे अशा संधी घेत असतात. ही तर गोष्ट नक्कीच दिसते की, आपल्यापाशी कर्तृत्व आहे, बुद्धी आहे आणि संधी हेरता आल्या आणि घेता आल्या तर पाहता पाहता आपण पाईकाचे वजीर होऊ शकतो असा हा काळ आहे; आणि याचा पुरेपूर फायदा उठवावा ही राजकीय कांक्षा आपण बाळगावी, हा भोसले कुळातील पुरुषांचा निर्णय होता. शिवोपासक ते राहिलेच. शिवाच्या कोणत्या स्थानाला आश्रय देणे राजकीयदृष्ट्या महत्त्वाचे व लाभाचे ठरणार आहे हा विचार करण्याइतके ते व्यवहारी होते.

संपूर्ण दक्षिणेच्या इतिहासाचा नवा बोध घडण्याच्या आड येणाऱ्या एका गोष्टीवर महामहोपाध्याय वा.वि. मराशी यांनी (कलचुरि नृपतींविषयी लिहिताना) नेमके बोट ठेवले आहे. ते लिहितात, "इ.स. च्या पाचव्या-सहाव्या शतकानंतर भारतीय राजे पुराणकालीन प्रसिद्ध राजवंशांशी आपला संबंध जोडण्यात धन्यता मानू लागले."[५] ढेरे यांनीही, वस्तुतः, त्यांच्या ग्रंथाच्या 'यादवांचे योगदान' या शेवटच्या प्रकरणात या मुद्याला वेगळ्या अंगाने स्पर्श केला आहे (पृ. ३३७). ज्यांना पूर्वी क्षत्रियप्रतिष्ठा नव्हती अशा समाजस्तरातून पुढे आलेल्या राज्यकर्त्यांनी 'क्षत्रियत्व' सिद्ध करण्यासाठी आपण यदुच्या वंशातले यादव आहोत, मूळचे क्षत्रिय आहोत, असा दावा करण्याच्या प्रक्रियेसाठी त्यांनी 'यादवीकरण' हा शब्द वापरला आहे. इतिहासाचा नवा व खरा बोध घडावयाचा असेल तर क्षत्रियत्वावर, खानदानी कूळ असण्यावर, पुरातन राजवंशियत्वावर जो दावा सांगितला जातो तो बाजूला ठेवून इतिहास जाणून घेण्याची भूमिका घेणे आवश्यक आहे. क्षत्रियत्वावरचा, खानदानावरचा दावा हा चातुर्वर्ण्याच्या चौकटीत आम्ही श्रेष्ठ वर्णाचे म्हणून जन्मजात श्रेष्ठ आहोत असा दावा असतो. कर्तृत्वाच्या, गुणांच्या, क्षमतांच्या कसोटीवर गवळी-धनगर वेगळे पडत नसतील; पण ते क्षत्रिय वर्णाचे असल्याचा दावा करू शकत नाहीत; आम्ही मात्र प्राचीन काळापासून जन्मजात क्षत्रिय वर्णाचे आहोत; कर्तृत्वशून्य व अक्षम असलो, क्षत्रियास साजेशा गुणांचा अभाव असला तरी आमचे क्षत्रियत्व अबाधित राहते; ही तर या दाव्याच्या गाभ्याशी असलेली धारणा आहे. चातुर्वर्ण्य आणि जातपात या दोन सैद्धांतिक चौकटी आपण अमान्य केल्या तरच इतिहासाचा नवा बोध लागू शकतो.

श्री. वासुदेवराव बिर्जे या मराठा विचारकाचे विवेचन ढेरे मोठ्या मान्यतेने उद्धृत करतात. त्यांच्या विवेचनातले एक वाक्य पुढील प्रमाणे आहे : "...पूर्वी कोण्या काळी धनगर उर्फ गवळी ही जात अगर या जातीतील काही घराणी (क्षत्रियांत) मोडत असावी असे दिसते." (पृ. ३४०). श्री. बिर्जे यांची

५. *कलचुरि नृपती आणि त्यांचा काल*, पृ. २.



अनुक्रमणिका

चोकट जन्मजात विषमता मानणारी, व समाजाची विभागणी उच्च-नीच जातपातींमध्ये करण्याची तीच कायम आहे.

सुविख्यात जर्मन अभ्यासक डॉ. गुंथर सोंथायमर यांचे म्हणणे श्री. बिर्जे यांच्या विवेचनाशी संवादी नाही, हे ढेरे यांच्या नजरेतून निसटले आहे. चातुर्वर्ण्याची चौकट सोंथायमर यांच्या प्रतिपादनात अप्रस्तुत आहे. "नीरेच्या खोऱ्यातील अनेक प्रख्यात मराठा कुळांचे मूळ धनगरांत आहे" असे सोंथायमर म्हणतात, तेव्हा स्वतःला मूळापासून जन्मजात क्षत्रिय वर्णाची मानणारी अनेक प्रख्यात मराठा कुळे वस्तुतः (ज्यांचे क्षत्रियत्व हीच प्रख्यात मराठा कुळे नाकारतात अशी) धनगर म्हणजे ह्यांच्याच लेखी शूद्र गणली जाणारी वा भटकी-जमातीय मानली जाणारी 'हीन' कुळे होती या सत्यावर सोंथायमर बोट ठेवीत आहेत. शिखर शिंगणापूरचा शंभुमहादेव हा मूलतः गवळी-धनगरांचा देव आहे, आणि त्याला शिखर क्षेत्रात आणणारा आद्य भक्त बळियप्पा हा भोसले कुळाचा मूळ पुरुष आहे, तेव्हा गवळी-धनगर आणि भोसले यांचे एकत्व या श्रद्धाकेंद्राच्या आधारे सिद्ध व दृढपणे सिद्ध होत आहे, हे ढेरे यांचे म्हणणे कुलशीलवान, स्वतःच्या 'क्षत्रिय खानदाना'चा अभिमान/गर्व बाळगणाऱ्या मराठा व्यक्तीच्या पचनी कसे पडेल? तो बळीप हा गवळी असला तरी 'मोठा राजा' होता, भगवान श्रीकृष्णांच्या यदुवंशातलाच होता असे सांगितले तरी, गवळी कुळाचा होता हे म्हटले की त्याचे क्षत्रियपण नाकारले जातेच ना. गवळी कुळातील पुरुषाने स्वकतृत्वाने राज्य संपादित केले, ते दोनचारशे वर्षे त्या कुळात टिकून राहिले तरी 'गवळी' असला तर तो क्षत्रिय वर्णाचा नाहीच होऊ शकत. तो कधीच गवळी नव्हता; गफलतीने काही काळ तसा समज पसरला, असे म्हणून त्याचे क्षत्रियत्व ठसवायला लागते. सिसोदिया रजपूत कुळाशी संबंध जोडण्याने व त्यास राज्याभिषेकाद्वारे प्रमाणित करण्याने शिवाजीमहाराजांच्या क्षत्रिय असण्याबद्दल उघडपणे शंका घेणे अशक्य करता आले. आता पुन्हा जर भोसले कुल मूळात एक गवळी घराणे होते — मग एखाद्या राजघराण्याची शाखा का ती असेना — ही गोष्ट जर शिष्टमान्य झाली तर उद्या कोणी त्यांच्या क्षत्रियपणाविषयीच या आधारे शंका घेईल; आणि, सोंथायमर यांचे म्हणणे जर उचलून धरले तर, मग तर कितीएक प्रख्यात मराठा कुळांचे क्षत्रियपणच धोक्यात येणार.

दक्षिण महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र, या विस्तीर्ण पठारी प्रदेशाचा इतिहास घडविण्यात गवळी-धनगर पशुपालक समाजांचा मोठा वाटा राहिला आहे; जी अनेकानेक मातब्बर घराणी आज स्वतःला उच्चवर्णीय मानून गवळी-धनगर समाजांहून स्वतःला श्रेष्ठ समजतात तीही बव्हंशी मूळात याच पशुपालकांपैकी आहेत; इतकेच नाही तर, ज्यांनी मोठी राज्ये स्थापन केली ती घराणीही खोलात जाऊन पाहिल्यास पशुपालक समाजांमधूनच उत्कर्ष पावल्याचे आढळते, हा ढेरे यांचा निष्कर्ष बरोबर आहे. लोकधर्म, लोककथा, लोकसाहित्य यांचा त्यांचा मोठा सखोल व्यासंग आहे. शिखर शिंगणापूर हे शिवक्षेत्र मध्यवर्ती ठेऊन जर आपण महाराष्ट्राचा इतिहास जाणून घेतला तर या प्रदेशातील लोक, त्यांचे लोकधर्म, कला, संस्कृती, राजकारण या सर्वांचे एक एकात्म दर्शन घडते; धार्मिक-सांस्कृतिक पावित्र्यसंभाराचा भूगोल व इतिहास जाणून घेता येतो; आपण कोण आहोत, आपण स्वतःला प्रदीर्घ इतिहासकाळात कसकसे घडवीत गेलो याची ओळख अधिक समग्र, सखोल व वस्तुनिष्ठ-ऐतिहासिक स्वरूपात होते याचा प्रत्यय त्यांच्या आयुष्यभराच्या व्यासंगाच्या, शोधयात्रांच्या ओघात त्यांनी जो घेतला त्याचे हृदयंगम व उद्‌बोधक दर्शन आपण मराठी माणसांना घडवू शकू, या विश्वासाने त्यांनी *शिखर शिंगणापूरचा श्रीशंभुमहादेव* हा ग्रंथ रचला. मराठी माणसाने ज्यांना देवतरूप मानले आहे त्या शिवछत्रपतींनाही मध्यवर्ती ठेवून हा अभ्यास व त्याचे निष्कर्ष लोकांसमोर ठेवू शकतो हे लक्षात आले तेव्हा ढेरे रोमांचित झाले असले पाहिजेत. मग अभ्यासकाची तटस्थता ते राखू शकले नाहीत. शिवछत्रपतींचे भोसले कुळ हे मूळ यादव, वेरूळ परिसरात येण्यापूर्वी कर्नाटकात त्याचे वास्तव्य होते आणि ते गवळी राजघराण्याची एका शाखा होते वगैरे या गोष्टी पर्याप्त प्रमाणात सिद्ध करण्यासाठी आधारभूत अशी कागदपत्रे, कोरीव लेख-ताम्रपट, व मौखिक स्मृतिपरंपरांचे सातत्य यासारखे पुरावे आपणास खरोखर मिळतात का, या प्रश्नाचे उत्तर निर्ममपणे त्यांनी दिले नाही, देऊ शकण्याइतकी तटस्थता त्यांना राखता आली नाही. शिवछत्रपतींच्या भोसले कुळाचा माग फार मागे जाऊन काढता येत नाही,"* हे लक्षात आल्यावर त्यांनी भोसले कुळाचा विषय बाजूला ठेवून मुख्य

* "किंबहुना, शिवछत्रपतींचे पणजोबा बाबाजीराजे भोसले यांच्या काळापूर्वीच्या कागदपत्रांत अथवा वाङ्मयात 'भोसले' नावाच्या कुळाचा उल्लेख सापडतच नाही; राजनामावली देण्याच्या प्रसंगी जी कुळे जुन्या वाङ्मयात उल्लेखिली जातात, त्यात 'शिरसाट' या कुळाचा मात्र उल्लेख येतो."










विषयावर लक्ष केंद्रित केले असते तर दक्षिण भारताच्या इतिहासाच्या, समाजाच्या जडणघडणीविषयी एक नवी, सखोल समज ते उत्पन्न करू शकले असते.

भारताच्या इतिहासाची सम्यक समज येण्यासाठी काही पूर्वशर्ती आहेत. (१) स्वतःला 'आर्य' म्हणविणारे लोक भारतीय उपखंडाबाहेरून येण्याअगोदर येथे अनेकानेक 'जन' (लोक) यांची वस्ती होती, आणि ते सर्व टोळी अवस्थेतले रानटी जीवन जगत होते असे नाही. 'सिंधू संस्कृती'चा काळ आपणास ज्ञात आहे. तो लक्षात घेता आपण असे म्हणू शकतो की, किमान ५ हजार वर्षांपूर्वी भारतभर जनपदे अस्तित्वात असण्याची शक्यता गृहीत धरली पाहिजे. जनपदाविषयी प्रा. हेमचंद्र रायचौधरी यांनी म्हटले आहे : "Janapada literally means the *pada*, abode, home of the *jana* or tribe. It is used in the *(Aitareya) Brahmana* text to denote a 'people', or the land or realm it occupies. It was the most important territorial unit of ancient India... Each developed *janapada* had its capital city, *pura, nagara*, sometimes also styled *putabhedana*, and if it included a maritime territory, its seaport, often termed *pattana*. It had its local ruler or chief. ... Each of these tracts of land possessed its own distinctive characteristics...."[६] तात्पर्य, दक्षिण भारताचा इतिहास नव्याने लिहावयाचा तर त्याची सुरुवात जनपदांपासून करावयास हवी. (२) भारतीय उपखंड हिमालयासारख्या उत्तुंग पर्वतरांगांनी व समुद्राने वेढलेले असले तरी बाहेरच्या जगाशी, जगातल्या लोकांशी येथील लोकांचे प्राचीनकाळापासून संबंध राहिले आहेत. बाहेरून खुष्कीच्या व जलमार्गाने लोक येत राहिले आहेत. लोक, धर्म, संस्कृती, समाजव्यवस्था, राज्यव्यवस्था, तत्त्वज्ञान, कला, विज्ञान — साऱ्या गोष्टींची सरमिसळ, घुसळण होत आली आहे याचे सतत भान राखले पाहिजे. आपला दृष्टिकोण आर्यकेंद्री असता उपयोगी नाही. (३) पहिले ज्ञात साम्राज्य अशोकाचे असे म्हणावयास हरकत नाही. त्याचे शिलालेख कर्नाटकाच्या दक्षिण टोकापर्यंत सापडले आहेत. बौद्ध व जैन यांचा धर्मविजयही दक्षिणेत पोचला होता. वैदिक संस्कृती अवैदिक प्रवाहांना, लोकांना सामावून घेत भारतीय उपखंडभर पसरत गेली ही गोष्टही प्राचीन आहे. उत्तर-दक्षिण अशी आपण विभागणी करीत असलो तरी उत्तर व दक्षिण मिळून एका संपूर्ण भारताची कल्पना-प्रतिमादेखील प्राचीन काळापासून येथे अस्तित्वात आहे. 'दक्षिणापथा'तील महापराक्रमी राजाची आकांक्षा, स्वप्न, दक्षिण व उत्तर भारतातील सर्व मुख्ये राज्ये अंकित करून 'सम्राट', 'चक्रवर्ती' बनण्याची असल्याचे आढळते. देवाणघेवाण, सरमिसळ, घुसळण या सगळ्या प्रक्रियांनंतरही स्थानिक व प्रादेशिक वैशिष्ट्ये व वेगळेपण पुरते नष्ट होऊन एकछाप समाजव्यवस्था व संस्कृती येथे प्रस्थापित झालेली नाही. आणि तरीही भारतीय उपखंडात सर्वत्र एकात्मतेचा प्रत्यय वैविध्यामध्येही येतो. (४) एका पातळीवर या देशातील मुसलमानी राजवटी 'परकीय' राहिल्या. आपण इस्लाम धर्माचे, येथील काफर हिंदू प्रजेवर राज्य करतो आहोत, ही धारणा कायम रुजलेली राहिली. त्याच वेळी, दुसरीकडे, बहुसंख्य मुसलमानांची हीच मातृभूमी-पितृभूमी होती. पवित्र धर्मस्थळे देशाबाहेर होती पण जेथे ती स्थळे होती ते देश त्यांचे नव्हते, तिथले लोकही त्यांचे नव्हते. या देशाची समाजव्यवस्था, राज्यव्यवस्था यांना त्यांचे योगदान राहिले. पण याहीपेक्षा धर्म-तत्त्वज्ञान, कला, भाषा, साहित्य, संस्कृती, जीवनशैली यांना त्यांचे योगदान विशेष राहिले. हिंदू विरूद्ध मुसलमान या आलोकातून इथला इतिहास धर्मवादी चौकटीत 'फिट' बसविणे अयोग्य व अवास्तव आहे याची जाण बाळगायला हवी.

*शिखर शिंगणापूरचा श्रीशंभुमहादेव* या ग्रंथाचा आलोक इतका व्यापक नाही असे जाणवते. उदाहरणार्थ, कथेतील हिवंजा कोळी हा वस्तुतः शिवच असतो. आता, कोळी हा गवळी-धनगर समाजापेक्षा वेगळा समाज आहे; तो पशुपालक समाज नाही. हिवंजा कोळीस्वरूप शिवाचा अनन्यभक्त असणारा बळीप, त्याचे वंशज स्वतःचे गवळीपण 'मराठे'पणात रुपांतरित करतात तसे कोळी समाजातल्या माणसांना गौण, हीन लेखताना आढळतात. हिवंजा कोळी हा, एका अर्थी, ज्यांना आपण 'आदिवासी' म्हणतो त्यांच्यापेकी आहे. आदिवासी आजही वनदेव-देवींचे उपासक आहेत. पण आज त्यांची स्थिती काय आहे? थोडक्यात, शिखर शिंगणापूरच्या श्रीशंभुमहादेवाच्या

६. 'Geography of the Deccan' in *The Early History of the Deccan*, part I-IV, (Ed: C. Yazdani), Oxford University Press, Bombay, 1960, p. 23.

स्थानाच्या इतिहासामधून महाराष्ट्राच्या सामाजिक-सांस्कृतिक-धार्मिक व राजकीय इतिहासावरही एक वेगळा व विदारक प्रकाश पडेल. पण हा बोध घेण्याकडे ढेरे आपली दृष्टी वळवीत नाहीत; ते शिवछत्रपतींच्या भोसले कुळात पार अडकून पडले आहेत.

अनेक परिमाणे, अंगे असलेल्या एका मोठ्या विषयाला तोंड फोडण्याचे फार मोलाचे कार्य पार पाडल्याबद्दल डॉ. रा.चिं. ढेरे यांचे आपण सर्व कायमचे ऋणीच राहू. त्यांच्या व्यासंगाचे, शोधयात्रेचे फलित म्हणून जे त्यांचे प्रमुख ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत त्या सर्वांचा एकत्रित विचार करून दक्षिण भारताचा, विशेषतः आंध्र, महाराष्ट्र, कर्नाटक या राज्यांतील पठारी प्रदेशातील लोकांचा धार्मिक-आध्यात्मिक-सांस्कृतिक-सामाजिक भूगोल व इतिहास सिद्ध करण्याचे त्यांनी केलेले बौद्धिक आवाहन वेळ न दवडता स्वीकारायला हवे आहे.

■■











# *राजा लियर* : सत्तासंघर्षाचे नाट्य

(भाग १)

सुधीर रसाळ

– १ –

या निबंधात मी शेक्सपियरलिखित आणि विंदा करंदीकर-भाषांतरित *राजा लियर* या नाटकाचा विचार करणार आहे. या निबंधातील माझे विश्लेषण आणि त्यातील माझी विधाने करंदीकरांनी भाषांतरित केलेल्या *राजा लियर*च्या संदर्भापुरतीच मर्यादित राहणार आहेत. त्यामुळे माझ्या विश्लेषणाची आणि विधानांची इष्टता किंवा सार्थकता ही करंदीकर-भाषांतरित *राजा लियर*च्या संदर्भापुरतीच मर्यादित राहणार आहे. ती शेक्सपियरच्या मूळ इंग्रजी नाटकाला लागू पडेलच असे नाही. विंदा करंदीकरांनी केलेले भाषांतर जर अचूक, प्रमाणित आणि विश्वसनीय असेल तर, अर्थातच, माझे सर्व विवेचन शेक्सपियरला लागू पडेल.

हा निबंध लिहिताना मी मूळ इंग्रजी नाटक आणि या नाटकावरची व शेक्सपियरवरची इंग्रजी समीक्षा वाचलेली नाही. *किंग लियर* हे अनेक वर्षांपूर्वी वाचलेले असले तरी निबंध लिहिताना त्याचा संदर्भ घेतलेला नाही. ज्याची अभिरुची आणि वाङ्मयीन समज मुख्यत्वेकरून मराठी वाङ्मयाच्या वाचनातून घडलेली आहे, अशा माझ्यासारख्या अभ्यासकाला शेक्सपियरच्या या श्रेष्ठ कलाकृतीचे आकलन कसे होते, हे पाहण्याचा हा प्रयत्न आहे. अन्य वाङ्मयीन सांस्कृतिक परंपरेतील अभिजात कलाकृतीच्या संदर्भात जर आपण आपली वाङ्मयीन समज तपाशीत राहिलो तर ती किती प्रमाणात सार्थ आहे, याचा आपल्याला अंदाज येऊ शकेल. अन्य भाषांतील अभिजात कलाकृतींच्या विश्लेषणातून आपली एकूण वाङ्मयीन समज अधिकाधिक निर्दोष आणि परिपूर्ण होऊ शकेल आणि तिच्यातून निष्पन्न होणाऱ्या सिध्दान्तांना सार्वत्रिकता लाभू शकेल.

प्रत्येक वाङ्मयीन संस्कृतीच्या वाङ्मयनिर्मितीच्या काही परंपरा असतात. प्रत्येक वाङ्मयीन संस्कृती आपापले वाङ्मयप्रकार घडवते आणि या वाङ्मयप्रकारांत निर्मिती शक्य होईल अशी एक संकेतव्यवस्था सिध्द करते. तिच्यात गरजेप्रमाणे फेरफार, वाढघट करते. हे सर्व त्या वाङ्मयीन संस्कृतीपुरते मर्यादित असले तरी त्यांच्या ठिकाणी वैश्विक आवाहनाची क्षमता असते. त्यामुळे एका वाङ्मयीन संस्कृतीने निर्मिलेले वाङ्मयप्रकार आणि वाङ्मयीन संकेत संक्रांत होऊ शकतात. प्रत्येक वाङ्मयीन संस्कृतीत वाचकाच्या अभिरुचीच्या आणि वाङ्मयीन समजेच्या परंपरा असतात. तिच्या साह्याने त्या संस्कृतीतील वाचक आपल्या वाङ्मयीन संस्कृतीत निर्माण होणाऱ्या वाङ्मयाचे आकलन-मूल्यमापन स्वाभाविकपणे आणि सहजपणे करतो. हे करताना त्याची अभिरुची आणि आकलन-मूल्यमापनाची प्रमाणके यातही बदल होत जातात. या बदलांमुळे त्याला आपल्या संस्कृतीतील एकूण वाङ्मयीन परंपरेचे अधिक परिपूर्ण आकलन होते. त्याच्या वाचनात जर परभाषेतील अभिजात कलाकृती आल्या तर त्याची अभिरुची आणि आकलन-मूल्यमापनाची प्रमाणके यांत अर्थपूर्ण बदल होतात. त्यांचे अधिकाधिक सार्वत्रिकीकरण होते. त्यामुळे त्याला आपल्या वाङ्मयीन संस्कृतीतील एकूण वाङ्मयकृतींची अधिक चांगली व्यवस्था लावता येते. आपल्या वाङ्मयीन संस्कृतीने दिलेल्या अभिरुचीच्या आणि वाङ्मयीन समजेच्या साह्याने आपण परभाषेतील अभिजात वाङ्मयकृतीचे केलेले आकलन-मूल्यमापन त्या परभाषेतील आकलन-मूल्यमापनापेक्षा वेगळे असू शकते. अनेकदा ते त्या वाङ्मयकृतीला अधिक चांगला न्याय देणारेही ठरू शकते. असे आकलन-मूल्यमापन जर त्या वाङ्मयकृतीच्या मूळच्या भाषेत गेले तर ते त्या भाषेतील त्या वाङ्मयकृतीच्या आकलन-मूल्यमापनाला वेगळी दिशा देणारे आणि त्या भाषेतील एकूण अभिरुचीला व वाङ्मयीन आकलन-मूल्यमापनाला समृध्द करणारे ठरू शकते. यासाठी एक गोष्ट करावी लागते ती म्हणजे अभ्यासविषय असलेल्या परकीय वाङ्मयकृतीचे वाचन, त्या भाषेतील समीक्षेच्या प्रभावाखाली करण्याचे टाळणे. आपण जेव्हा हिंदी सोडून अन्य भारतीय भाषांतील किंवा इंग्रजी सोडून अन्य पाश्चात्त्य भाषांतील वाङ्मयकृतींचा अभ्यास करतो तेव्हा त्या भाषा आपल्याला सामान्यपणे अवगत नसल्यामुळे आपण ताजेपणाने, आपल्या अभिरुचीच्या साह्याने तो करू शकतो. हिंदी आणि इंग्रजी भाषेतील वाङ्मयकृतीची समीक्षा आपल्याला उपलब्ध असल्यामुळे तिच्या वाचनानंतर त्या







अनुक्रमणिका

वाङ्मयकृतीचा आपण केलेला अभ्यास या समीक्षेने प्रभावित होऊ शकतो. अशा प्रकारचा आपला अभ्यास फारसे काही साधू शकत नाही. इंग्रजी भाषेतील वाङ्मयकृतीचा आपण केलेला अभ्यास तिच्यावरील इंग्रजी समीक्षेमुळे फार मोठ्या प्रमाणात प्रभावित होतो. अभ्यासविषय असलेल्या इंग्रजी वाङ्मयकृतीवरची इंग्रजी समीक्षा वाचल्याशिवाय हा अभ्यास करणे इष्ट नाही, असा आपला समज असतो. याचे कारण गेल्या पावणे-दोनशे वर्षांच्या इंग्रजी राजवटीमुळे, आपण कितीही काही म्हटले तरी, त्यांच्या वाङ्मयीन संस्कृतीचे अनुयायित्व आपण स्वीकारलेले असते. त्यामुळे त्यांनी त्यांच्या वाङ्मयकृतीचे केलेले आकलन-मूल्यमापन आपल्याला योग्य वाटते; आणि तेच मूलतः स्वीकारून आपल्या अभ्यासात काही बारीक-सारिक गोष्टींची आपण भर घालतो. त्यामुळे आपले या प्रकारचे आकलन आपल्याला 'नवे'ही वाटते आणि आपण इंग्रजी वाङ्मय-परंपरेचा घटक असल्याचे समाधानही आपणांस मिळवून देते.

विंदा करंदीकरांनी आपल्या भाषांतराच्या प्रस्तावनेत लियरच्या 'आत्मिक पुनरुज्जीवना'ची इंग्रजी समीक्षेतील संकल्पना स्वीकारून *लियर*ची मीमांसा केली आहे. (*राजा लियर* प्रस्ता. पृ. ४०) स.रा. गाडगीळांनीही तोच मार्ग अवलंबिला आहे. त्यांनीही 'आत्मिक पुनरुज्जीवना'ची संकल्पना आणि लियर हा 'अर्धसंस्कृत प्राथमिक समाजाचा घटक व राजा' असल्याचा इंग्रजी समीक्षेतील मुद्दा स्वीकारून या नाटकाची समीक्षा केली आहे. (*शोकात्म विश्वरूप दर्शन* पृ. १७२-१८३). त्यामुळे त्यांची *राजा लियर*वरची समीक्षा इंग्रजी परंपरेतील लियरच्या आकलन-मूल्यमापनाचा परिचय करून देणारी ठरते. एखादा दुसरा नवा मुद्दा सोडल्यास ही समीक्षाही इंग्रजी समीक्षेचा 'अनुवाद'च असते.

*राजा लियर* या नाटकात लियरचे आत्मिक पुनरुज्जीवन चित्रित केले आहे, हा निष्कर्ष ख्रिश्चन विचारप्रणालीतून या नाटकाकडे पाहिल्यामुळे प्राप्त झाला आहे. लियर-कॉर्डीलिआच्या शेवटच्या पर्वात झालेल्या भेटीतील लियरच्या संभाषणाचा याला आधार आहे. लियर म्हणतो, "तुम्ही माझ्यावर अन्याय करता, मला कबरीमधून बाहेर काढण्यात; तू आहेस आनंदमय आत्मा, पण मला आहे बांधलेले एका अग्निचक्रावर, ज्याने माझे स्वतःचे अश्रू आहेत उकळत वितळलेल्या शिशासारखे" (४.७.१७०) यात "अग्निचक्रा"वर बांधण्याची कल्पना बायबलच्या नव्या करारात असल्याचा दाखला दिला जातो आणि "आनंदमय आत्म्या"चा साक्षात्कार याचा आधार घेतला जातो. सुळावर येशूला खिळल्यानंतर तो प्राण त्याग करतो. त्याला थडग्यात दफन केल्यानंतर तिसऱ्या दिवशी तो थडगे उघडून बाहेर पडतो. तेथे आलेल्या मारिया माग्दालिनाला थडग्याजवळ दोन दिव्य देवदूत बसलेले दिसतात. बायबलमध्ये आणखी एक उल्लेख आढळतो. येशूने प्राणत्याग केल्याबरोबर बावन्न थडगी उघडली जातात आणि त्यातील देवमाणसे जिवंत होऊन बाहेर पडतात. शेक्सपियर ख्रिश्चन असल्याने त्याच्या लेखनात बायबलसंलग्न प्रतिमा येणे स्वाभाविक आहे. कदाचित "आत्म्याचे पुनरुज्जीवन" ही जाणीव अभिव्यक्त करणे शेक्सपियरला अभिप्रेत असेल. परंतु एखाद्या वाङ्मयकृतीचे आकलन म्हणजे लेखकाला काय अभिप्रेत आहे, हे जाणून घेणे नव्हे. वाचकाच्या आकलनात वाङ्मयकृतीतील सर्व घटकांची संगती शोधताना त्या संगतीच्या संदर्भात लेखकाने योजिलेल्या शब्दांच्या जाणवणाऱ्या सार्थतेला महत्त्व असते. जेव्हा "आत्म्याचे पुनरुज्जीवन" या जाणिवेच्या आधारे *राजा लियर* या नाटकातील सर्व घटकांची संगती प्रस्थापित करता येईल तेव्हा शेक्सपियरला ही जाणीव प्रकट करायची होती, असे म्हणता येईल. परंतु "थडग्यातून" पुनरुज्जीवित होऊन बाहेर पडल्यावरही लियरचा "पार्थिव अस्मितेचा विनाश" झाल्याचे दिसत नाही. त्याचे रागलोभ, समज-गैरसमज, मुलींनी छळल्याची दुःखपूर्ण जाणीव कायमच आहे. कॉर्डीलिआत 'आनंदमय आत्मा' दिसल्यावरही तो तिला उद्देशून म्हणतो, "मला ठाऊक आहे, तुझे माझ्यावर प्रेम नाही; तुझ्या बहिणींनी, मला अगदी निश्चित आठवते, माझा आहे छळ केलेला..." (४.७.१७१) लियरचा जर पार्थिवतेकडून अपार्थिवाकडे प्रवास झालेला असेल तर तो या क्षणी त्याला यातना देणाऱ्या या गोष्टींबद्दल का बोलतो? कॉर्डीलिआचे आपल्यावर प्रेम नाही, हे त्याचे स्मरण त्याच्या अस्मितेशी निगडित आहे. मृत कॉर्डीलिआसंबंधी तो म्हणतो; "... ती जिवंत आहे! तसे असल्यास या एकाच भाग्ययोगाने होऊ शकेल पुरेपूर भरपाई मी भोगलेल्या सर्व दुःखांची". (५.३.१८७) येथे त्याने भोगलेल्या दुःखांची स्मृती आणि त्यांचा सल कायम आहे. आपल्याला छळणाऱ्या मुलींना शिक्षा देऊन तो आपल्या दुःखाची भरपाई करणार होता. आता कॉर्डीलिआ जिवंत असण्याने त्याच्या सर्व दुःखाची भरपाई होणार आहे. "आपल्या" सर्व दुःखांची भरपाई झाली पाहिजे

असे वाटणे हे पार्थिव पातळीवरच्या अस्मितेचे लक्षण आहे. पुढे तो सर्वांना उद्देशून शापवाणी उच्चारतो, "तुम्हां सर्वांचा होवो सत्यानाश, तुम्हां खुन्यांचा आणि राजद्रोह्यांचा!" (५.३.१८७) येथेही सर्वांनी आपल्याशी द्रोह केल्याची कटू जाणीव आहे. लियरच्या जिजीविषेचा शेवटपर्यंत अस्त झालेलाच नाही. कॉर्डीलिआसमवेत उर्वरित आयुष्य आनंदात कंठण्याची त्याची इच्छा आहे. तो कॉर्डीलिआला म्हणतो, "...आपण आणू आव विश्वाचे गूढ आपल्याला समजल्याचा, जणू आपण परमेश्वराचा हेर असल्यागत, आणि आपण राहू टिकून भिंतीने वेढलेल्या एखाद्या तुरुंगामध्ये...." (५.३.१७७) याचा अर्थ त्याला अजूनही खूप जगावेसे वाटते. लियरची पार्थिव अस्मिता अजूनही कुठेतरी टिकून आहे. हे करंदीकरांनाही जाणवले असावे. ते म्हणतात, "तरीही हा लियर म्हणजे योगी किंवा मुक्तात्मा नव्हे. तो अजूनही... गॉनरिल व रीगन यांचे अनिष्ट चिंतू शकतो, कॉर्डीलिआला फाशी देणाऱ्या माणसाला ठार मारू शकतो, तिच्या मृत्यूची वस्तुस्थिती नाकारू पाहतो. पण या गोष्टी पार्थिव अस्मितेतून स्फुरलेल्या नसतात. कॉर्डीलिआवरील निरपेक्ष प्रेमाचाच हा सर्व मानवसुलभ आविष्कार ठरतो." (प्रस्तावना पृ. ५२) मुक्तात्मा किंवा योगी झालेल्या व्यक्तीच्याच "पार्थिव अस्मितेचा विनाश" झालेला असतो. लियर 'मुक्तात्मा' नाही; त्याचे वैयक्तिक रागलोभ शिल्लक आहेत, असे जर दिसत असेल तर लियरमधील परिवर्तनाचे "पार्थिव अस्मितेच्या विनाशातून घडलेले मानवी आत्म्याचे पुनरुज्जीवन" असे वर्णन करता येणार नाही.

स.रा. गाडगीळांनी लियरची 'पार्थिव अस्मिता' मानवाच्या अर्धसंस्कृत प्राथमिक अवस्थेशी जोडली आहे. प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे ख्रिश्चन विचारप्रणालीचा प्रभाव असलेल्यांकडून लियरच्या जीवनाचे आणि स्वभावाचे या प्रकारचे विश्लेषण होते. ख्रिश्चनपूर्व जग 'पॅगन', अर्धसंस्कृत मानले जाई. लियर ख्रिश्चनांप्रमाणे एकेश्वर मानणारा नाही. तो अनेक देवता मानतो. आपल्याला छळणाऱ्या मुलींचे या देवतांनी वाईट करावे असे इच्छितो. मुलींना शाप देतो. हे सर्व श्रद्धाळू ख्रिश्चनाच्या दृष्टीने अर्धसंस्कृत अवस्थेचे लक्षण आहे. पुढे तो पददलितांबद्दल कणव दाखवतो; त्यांच्यासाठी आतापर्यंत आपण काहीच केले नाही, असा पश्चात्ताप प्रकट करतो. त्याचे मन करुणेने भरून येते. या मूल्यांना ख्रिश्चनधर्मात महत्त्व आहे. म्हणजे लियरचा प्रवास मूल्यविहीनतेकडून मूल्यात्मकतेकडे, किंवा एका परीने पॅगन धर्माकडून सुसंस्कृत ख्रिश्चन धर्माकडे झाला आहे, अशी या विवेचनामागे, प्रकटाप्रकट स्वरूपात, भूमिका आहे. परंतु लियर केवळ आत्मकेंद्री, स्वार्थी, स्वतःच्या ऐहिक जीवनाला महत्त्व देणारा नाही. तो न्यायप्रिय आहे. स्वतः दिलेला शब्द पाळणारा आणि दुसऱ्यानेही तो पाळावा असे मानणारा आहे. पितृधर्म आणि अपत्यधर्म यांना महत्त्व देणारा आहे. त्याच्या चांगुलपणामुळेच केंट, ग्लॉस्टर, आणि ऑल्बनीसारखे नरेश-जहागीरदार त्याच्यावर प्रेम करतात आणि निष्ठा ठेवतात. 'अर्धसंस्कृत' समजल्या गेलेल्या लियरच्या पदरी असणाऱ्या विदूषकाजवळ जगण्यासाठी आवश्यक असणाऱ्या शहाणपणाचा समृद्ध असा साठा आहे आणि वेळोवेळी हे शहाणपण तो प्रकट करतो. तेव्हा लियर आणि त्याचे जग हे चांगल्यावाईटाने भरलेले असले तरी ते अर्धसंस्कृत – म्हणजे अर्धरानटी – म्हणता येणार नाही.

वाङ्मयकृतीमध्ये तिच्या भाषिक संस्कृतीतील प्रतिमासृष्टी उपयोजिली जाणे स्वाभाविक असते. एवढेच नव्हे तर वाङ्मयकृतीतून प्रकटणाऱ्या जाणीवाही त्या भाषिक संस्कृतीतून घडलेल्या असतात. त्यामुळे अशी प्रतिमासृष्टी आणि जाणिवा आपल्याला 'परक्या'ही असतात. त्यांची वाङ्मयीन यथार्थता आणि मूल्य आपल्या आकलनात पूर्णपणे कधीच येऊ शकत नाही. परभाषेतील वाङ्मयकृती त्या संस्कृतीतील वाचकांना जेवढ्या कळतात आणि भावतात तेवढ्या त्या आपल्याला कळू अगर भावू शकत नाहीत. वाङ्मयकृती ही शंभर टक्के वैश्विक अगर सार्वत्रिक कधीही नसते. ज्या संस्कृतीत वाङ्मयकृती निर्माण होते त्या संस्कृतीतही ती शंभर टक्के वैश्विक अगर सार्वत्रिक राहत नाही. तिची पुष्कळशी सामग्री इतिहासगत होते आणि अशा वेळी वाचकाला ती पूर्णतः भावनिक प्रत्यय देऊ शकतेच असे नाही. असे असले तरी महान वाङ्मयकृतीतील जाणिवा, प्रतिमा इत्यादींमध्ये तिची निर्मिती करणाऱ्या विवक्षित सांस्कृतिक घटकांच्या पलिकडे जाऊ शकणारे असे अनेक घटक असतात की जे कुठल्याही संस्कृतीतील वाचकाला अर्थपूर्ण प्रत्यय देऊ शकतात.

ख्रिश्चन विचारप्रणालीतून जन्मलेल्या *राजा लियर* मधील पूर्वचर्चित प्रतिमेचा या दृष्टीने विचार करता येईल. दीर्घ निद्रेतून जागा झालेल्या आणि वेड कमी झालेल्या लियरला कॉर्डीलिआ म्हणते, "...महाराज, आपल्याला कसे वाटतेय?" लियर म्हणतो, "तुम्ही माझ्यावर अन्याय करता, मला कबरीमधून बाहेर

काढण्यात; तू आहेस आनंदमय आत्मा; पण मला आहे बांधलेले एका अग्निचक्रावर, ज्याने माझे स्वतःचेच अश्रू आहेत उकळत वितळलेल्या शिशासारखे". कॉर्डीलिआ म्हणते, "आपण मला ओळखता का?" लियर म्हणतो, "ओळखतो, तू आहेस एक मृतात्मा; कुठे घडला तुझा मृत्यु?" (४.७.१७०) खरे म्हणजे जागे झाल्यावर लियरने कॉर्डीलिआला ओळखलेले असते. ती आपल्या सुटकेसाठी सैन्य घेऊन आल्याचे त्याला माहीत असते. आपण तिच्यावर अन्याय केल्याच्या अपराधीपणाच्या भावनेमुळे तो तिला भेटायचे टाळत असतो. आताही त्यांची भेट झाल्यावर जेव्हा ती त्याच्यापुढे गुडघे टेकते तेव्हा अपराधीपणाच्या भावनेने तोही तिच्यापुढे गुडघे टेकतो. या अपराधीपणाच्या भावनेतूनच तो येथे बोलतो. आपण कॉर्डीलिआशी नाते तोडले; ती आपल्याला आणि आपण तिला मेलो. हे नाते तोडल्यावर फ्रान्सला त्याने म्हटलेले असते की, ".... आम्हांला नाहीच झालेली असली मुलगी, आम्हांला नाही इच्छा तिचे तोंड पुन्हा पाहण्याची." (१.१.८०) परंतु ती आता प्रत्यक्ष समोर उभी आहे. मुलीचा धर्म निभावते आहे. आपण तिला मेलेलो असताना ती आपल्याला पुन्हा 'जिवंत' करते आहे; आपल्याशी नाते जोडते आहे. हे तो कृतज्ञतेच्या भावनेने बोलतो. पण येथे एवढेच नाही. गाढ निद्रेत असताना तो सर्व यातना विसरलेला आहे. आपण तसेच निद्रेत राहिलो असतो तर आपल्या सर्व यातनामय स्मृतीतून आपली सुटका झाली असती. ही निद्रा म्हणजे एका परीने मृत्यूच. पण मुलीने आपल्याला जागे केल्यामुळे सर्व वेदनांचे असह्य ठसठसणे पुन्हा सुरू झाले आहे. हा जणू तिने आपल्यावर केलेला अन्यायच आहे. झोपेतून जागे झाल्यावर लियरला आपल्या आवडत्या मुलीचा प्रसन्न चेहरा दिसतो. त्याच्या वरच्या प्रेमाचे आणि त्याच्याबद्दलच्या करुणेचे भाव तिच्या चेहऱ्यावर आहेत. म्हणून तो म्हणतो, "तू आहेस आनंदमय आत्मा". येथे त्याला तिच्या आणि आपल्या स्वतःच्या मनोवस्थांतील फरकही सांगायचा आहे. त्यासाठी तो तुलना करीत आहे. यातील प्रतिमांना जोडणाऱ्या 'पण' या शब्दाने तिच्या आणि त्याच्या मनोवस्थांमधील फरक त्याने अधोरेखित केला आहे. तिचे वाईट चिंतूनही तिचे सर्व भलेच झाले आहे. आणि या उलट स्वतःच्या प्रतिष्ठेला व अहंकाराला जपणाऱ्या लियरच्या वाट्याला अप्रतिष्ठेच्या, अवमानाच्या यातना आणि दुःख आलेले आहे. एकीकडे तिचा आनंदमय आत्मा आणि दुसरीकडे त्याचे अग्निचक्रावर बांधले जाणे आणि उकळत्या शिशासारखे त्याचे अश्रू, यांची तुलना करीत लियर आपल्या दुःखाची तीव्रता प्रकट करतो. राज्यवाटणीचा प्रसंग सोडल्यास लियरला कॉर्डीलिआ सदैव 'आनंदमय आत्मा' वाटत आली. राज्यवाटणीच्या वेळी तो कॉर्डीलिआचे वर्णन "आमच्या सुखाची रास" (१.१.७४) असे करतो. आता ती त्याच्यासमोर चेहऱ्यावर अतीव प्रेमाचा भाव आणून उभी आहे. तेव्हा त्याच्याही मनांत तिच्याबद्दलचे मृदू भाव उफाळून येतात. या भावाच्या अर्थच्छटाही त्याच्या या बोलण्यातून व्यक्त होतात. त्याचे हे सर्व बोलणे त्याच्या पश्चात्तापातून स्फुरलेले आहे. नंतर लगोलग तो तिला "तू आहेस मृतात्मा..." असेही म्हणतो. शेक्सपियरला एकाच वेळी लियरचे वेड आणि या वेडामागील त्याचे सुप्त शहाणपणही प्रकट करायचे आहे. या प्रतिमेचा संबंध त्याच्या "कबरीत" असण्याशी आणि राज्य वाटताना त्याने तिच्याशी तोडलेल्या नात्याशी आहे. त्याने स्वतःपुरते तिला 'मृत'केले आहे आणि आता ती त्याच्यासमोर मृतात्म्यासारखी उभी आहे. आपण नेमके कोठे आहोत, हाही त्याच्यापुढे प्रश्न आहे. जेथे मी तुला 'मृत' मानले तेथेच आता तू आणि मी आहोत का, असे तो तिला विचारतो आहे. लियरचे वेड दाखवण्यासाठी त्याच्या बोलण्यातील सर्व गर्भित सुसंगतीचे सूचन त्याच्या विसंगतीपूर्ण बोलण्यातून शेक्सपियरला करायचे आहे. आपणांस जरी ख्रिश्चन विचारप्रणाली ज्ञात नसली तरी आपण या प्रतिमांचे आकलन या प्रकारे करू शकतो. इंग्लिश भाषक अभ्यासकाला या आकलनाच्या जोडीला ख्रिश्चन विचारप्रणालीतून सूचित होणाऱ्या अर्थच्छटाही जाणवतील. ख्रिश्चन विचारप्रणाली ज्ञात नसतानाही आपणांस या प्रतिमा काही अर्थांचे सूचन करतात कारण या प्रतिमांमध्ये असे आकलन आपल्यात समाविष्ट करून घेण्याची क्षमता आहे. अशा प्रकारची क्षमता ज्या प्रतिमांमध्ये किंवा वाङ्मयकृतीच्या घटकांमध्ये असते त्या प्रतिमा किंबहुना ती वाङ्मयकृती कुठल्याही भाषिक संस्कृतीमध्ये अर्थपूर्ण ठरू शकते. वाङ्मयकृतीला सार्वत्रिक बनवणारे असे एक अंग तिला असू शकते. ज्या वाङ्मयकृतीतील प्रतिमा, जाणिवा किंवा अन्य घटक त्या भाषिक संस्कृतीपुरत्याच सीमित असतात ते अन्य भाषकाच्या आकलनकक्षेत येऊ शकत नाहीत. त्यामुळे तेवढ्यापुरती त्याला ती वाङ्मयकृती अज्ञातच राहते. अभिजात, महान वाङ्मयकृतीचे घटक विशिष्ट संस्कृतीच्या वातावरणात जन्मूनही ते आपल्या जनक संस्कृतीच्या कक्षा ओलांडून वैश्विक, सार्वत्रिक बनतात.

अनुक्रमणिका

शेक्सपियरलिखित *राजा लियर* हे नाटक या जातीचे आहे. म्हणून एका वेगळ्या संस्कृतीतील वाचक या नात्याने हे नाटक मला कशा प्रकारे अर्थपूर्ण वाटते याचे विवेचन मी या निबंधात करणार आहे. विंदा करंदीकरांनी या नाटकाचे केलेले भाषांतर विश्वसनीय व प्रमाणित आहे, हे माझे गृहितकृत्य आहे. म्हणून माझ्या विवेचनातील माझी विधाने मी शेक्सपियरलिखीत *राजा लियर*च्या संदर्भात केलेली आहेत.

– २ –

नाटकातील व्यक्तींच्या प्रेरणांमधील संघर्षातून नाट्य निर्माण होते आणि ते निर्णायक अवस्थेपर्यंत विकसितही होत जाते. व्यक्तीचे प्रेरणाव्यूह आणि त्यातील प्रेरणांचे बदलत जाणारे अग्रानुक्रम हे नाट्यनिर्मितीत केंद्रस्थानी असतात. व्यक्तीचे सामाजिक स्थान, समाजरचनेत त्याच्या वाट्याला आलेली भूमिका, त्याच्या भोवतीची एकूण परिस्थिती, या सर्वांशी संबंधित असलेली व व्यक्तीने स्वीकारलेली मूल्यसरणी या सर्व गोष्टींचा आणि व्यक्तीच्या नैसर्गिक प्रेरणांचा परस्परांवर परिणाम होऊन त्यातून त्या व्यक्तीचा प्रेरणाव्यूह व त्यातील प्रेरणांचे अग्रानुक्रम निश्चित होत जातात. या सर्व घटकांतील परस्परपरिणामातही नाट्य असते. किंबहुना व्यक्तीच्या प्रेरणांमधील संघर्षात या सर्वच गोष्टी अंतर्भूत असतात. त्यामुळे त्याही नाट्याचा घटक असतात. म्हणूनच आपण जेव्हा नाट्याचा विचार करतो तेव्हा आपण प्रेरणांच्या संघर्षात सहभागी होणाऱ्या या सर्व गोष्टींमधील अंतर्गत नात्यांचा, त्यांच्यात होणाऱ्या परस्पर परिणामांचा विचार करतो.

नाटक हा कथनप्रकार नसल्यामुळे व्यक्तीच्या प्रेरणा व मूल्ये यांच्या व्यूहाच्या जडणघडणीला कारणीभूत असलेल्या त्याच्या पूर्वायुष्याचे प्रत्यक्ष आणि सलग कथन त्यात येत नाही. नाटकातील व्यक्ती, नाट्यसंलग्न संभाषणामध्ये त्यांच्याशी अपरिहार्य ठरणारे पूर्वायुष्याचे अनुषंगिक कथन करतात. परंतु त्या कथनात कालाची व घटनाक्रमाची सलगता नसते. सलग, कालक्रमानुसार घडणाऱ्या घटनांची नव्हे तर विशिष्ट कालावकाशातील प्रत्येक वर्तमानक्षणी घडलेली कृती आणि तत्संलग्न भाषिक व्यवहार यांची संघटना नाटकात बांधली जाते. ती बांधली जाताना व्यक्तीच्या पूर्वायुष्याचे, त्याच्या प्रेरणाव्यूहाच्या व मूल्यसरणीच्या जडणघडणीचे सूचन नाटकातून होत असते. हे सूचन करणारे स्पष्टास्पष्ट उल्लेख नाटकभर विखुरलेले असतात. असे जागोजाग विखुरलेले उल्लेख आणि नाटकातील व्यक्तींच्या बोलण्यातून केले गेलेले प्रासंगिक व अनुषंगिक कथन यांच्या आधारे नाटकातील व्यक्तींच्या पूर्वजीवनाचा, त्यांच्या प्रेरणा, मूल्ये व जीवनविषयक दृष्टिकोण यांच्या व्यूहाच्या जडणघडणीचा आराखडा वाचकाला कल्पावा लागतो; नाटकातील व्यक्तींच्या कृति-उक्तींची, विशेषतः प्रारंभिक कृतिउक्तींची, संगती आणि अर्थपूर्णता या आराखड्याच्या संदर्भात जाणवू शकते. म्हणून वाचक जर असा आराखडा तयार करू शकला नाही तर त्याचे नाट्याकलन बाधित होते. नाटकाच्या प्रारंभिक कृती आणि उक्ती यांत प्रामुख्याने या आराखड्याच्या सूचना असतात. नाटक जसे जसे पुढे जाते तशा तशा आराखड्याची पूर्तता करता येण्याजोग्या सूचना नाटकातून मिळत जातात. वाचक जेव्हा नाटक पाहून किंवा वाचून संपवतो तेव्हा त्याच्या आकलनात नाटकाचा पाया असलेला वाचककल्पित आराखडा आणि त्यातून जन्मलेली, त्याच्याशी सुसंगत आणि अर्थपूर्ण असलेली नाटककारनिर्मित नाट्यसंघटना एकत्रपणे आकार घेते. वाचकाच्या बाबतीत असे घडले की त्याचे नाट्याकलन परिपूर्ण होते.

या संदर्भात आपण *राजा लियर*चा विचार करू. नाटकाच्या प्रारंभीच्या प्रवेशात शेक्सपियरने लियरच्या आणि इतर व्यक्तींच्या नाट्यपूर्व जडणघडणीचे अनेक सूचक उल्लेख केलेले आहेत. नाटक वाचू लागताच पुढील गोष्टी आपल्या लक्षात येऊ लागतात. लियर हा राजा असून त्याच्या राज्यातील विविध भूभागांवर राज्य करणारे अनेक नरेश आणि जहागीरदार आहेत. राजा लियर हा वृध्द असून त्याला तीन कन्या आहेत. मोठी गॉनरिल, हिचे लग्न ऑल्बनीच्या नरेशाशी आणि दुसरी रीगन, हिचे लग्न कॉर्नवालच्या नरेशाशी झाले आहे. त्याची तिसरी मुलगी कॉर्डीलिआ ही त्याची आवडती असून अजून ती अविवाहित आहे. तिचे प्रियाराधन करण्यासाठी बर्गंडीचा नरेश आणि फ्रान्सचा राजा लियरकडे तळ ठोकून आहेत. लियरच्या राजमंडळातील ग्लॉस्टरचा आणि केंटचा जहागीरदार — विशेषतः केंटचा जहागीरदार — अतिशय स्वामिनिष्ठ आहेत. राज्याचा गाडा दीर्घकाळ ओढणारा राजा लियर आता राज्य करायला कंटाळला आहे. आपले राज्य आपल्या तीन मुलींत विभागून देण्याचे त्याने ठरवले आहे. हे सर्व उल्लेख प्रत्यक्षा-प्रत्यक्षपणे प्रारंभीच्या प्रवेशात येतात. त्याबरोबरच लियरच्या राज्याच्या वाटणीचा नाट्यपूर्ण प्रसंगही साकार होऊ लागतो.

आपल्या राज्याचे वाटे मुलींकडे सोपवण्याआधी राजा लियर आपल्या तिन्ही मुलींना, तुम्हां तिघींपैकी कोण माझ्यावर सर्वाधिक प्रेम करते ते सांगा, असे म्हणतो. पहिल्या दोन्ही मुलींनी बापावरील आपल्या प्रेमाच्या केलेल्या अतिशयोक्त वर्णनाने तो खूष होतो. आपली सर्वात लाडकी मुलगी, कॉर्डीलिआ, ही आपल्यावरील तिच्या प्रेमाचे उत्कट व अलंकारिक भाषेत वर्णन करील अशी लियरची अपेक्षा असते. परंतु अपत्यधर्माशी सुसंगत असे आणि एवढेच प्रेम आपण आपल्या बापावर करतो, असे ती सांगते. लियर तिच्यावर संतापतो. तिच्याशी असलेले आपले बापाचे नाते तो तोडून टाकतो. त्याच्या या अविचाराचा निषेध करणाऱ्या व त्याला आपल्या निर्णयापासून परावृत्त करू पाहणाऱ्या केंटच्या जहागीरदाराला तो हद्दपारीची शिक्षा सुनावतो.

या घटनांचे चित्रण करताना लियरचे वय किती याचा उल्लेख शेक्सपियरने प्रारंभीच्या भागात केलेला नाही. त्याचा उल्लेख चौथ्या अंकाच्या सातव्या प्रवेशात येतो. येथे लियर म्हणतो, "मी आहे खुळा म्हातारचळ लागलेला वृध्द माणूस, चार विसांच्या पलिकडे गेलेला, एक तासही अधिक नाही — कमी नाही.." (४.७.१७१) लियरच्या कृतिउक्तींच्या संघटनेच्या अर्थपूर्णतेच्या संदर्भात हा वयाचा उल्लेख फार महत्त्वाचा आहे. तो नाट्यारंभी येणे अर्थपूर्ण ठरले असते. परंतु नाटकातील घटना आणि त्याचे ऐंशी वर्षांचे वय याचे गणित नीट जुळत नाही. राज्य करण्याचा कंटाळा आला, आपण आता थकलो, आपल्या हयातीत राज्याची सूत्रे मुलींच्या हाती सोपवण्याचा त्याचा विचार, हे सर्व त्याच्या ऐंशी वर्षांच्या वयाशी सुसंगतच आहे. परंतु त्याच्या मुलींच्या वयांशी मात्र त्याचे हे वय नीट जुळत नाही. लियर ज्या काळातला राजा आहे त्या काळात लियरचे लग्न आधी, म्हणजे सामान्यपणे तो अठरा-वीस वर्षे वयाचा असताना झालेले असणार. त्याची पहिली मुलगी, उशिरात उशीरा, म्हणजे, त्याच्या वयाच्या बाविसाव्या, दुसरी चोविसाव्या आणि तिसरी सहाविसाव्या वर्षी झालेली असणार. त्याची तिसरी मुलगी उपवर वयाची म्हणजे सोळा ते अठरा वर्षे वयाची आहे. म्हणजे राज्याच्या वाटण्या करताना त्याचे वय चव्वेचाळीस वर्षांचे होते. हा हिशोब अजून सैल केला तरी त्याचे वय पन्नासच्या पुढे जात नाही. लियरचे वय ऐंशी होते असे गृहित धरून जर आपण मागे गेलो तर गॉनरिल, रीगन व कॉर्डीलिआ यांचे जन्म अनुक्रमे लियरच्या वयाच्या अठ्ठावन्नाव्या, साठाव्या आणि बासष्टाव्या वर्षी झाले असे मानावे लागते. या तिन्ही मुली त्याला तरुणपणीच झाल्या असून त्याने आपले राज्य वयाच्या ऐंशीव्या वर्षी वाटले, असे जर मानले तर राज्य वाटण्याच्या वेळी कॉर्डीलिआचे वय चोपन्न वर्षांचे होते. या वयात तिचे प्रियाराधन करण्यास बर्गंडीचा नरेश व फ्रान्सचा राजा आले असे मानावे लागते. लियरचा होणारा छळ, त्याला जीवनसत्याचे होणारे नवे दर्शन, या घटनांची उत्कटता, भीषणता आणि अर्थपूर्णता त्याच्या ऐंशी वर्षे वयाच्या उल्लेखाने अनेक पटींनी वाढते आणि त्याची शोकान्तिका अधिक गडदही होते, हे जरी खरे असले तरी त्यामुळे गॉनरिल, रीगन, एडमंड, कॉर्डीलिआ इत्यादिकांच्या जीवनात घडणाऱ्या घटना असंभाव्य बनून जातात.

आपण जेव्हा लियरच्या राज्याच्या वाटणीचा आणि त्याच्या छळाचे संपूर्ण प्रसंग वाचून संपवतो तेव्हा आपल्या मनात अनेक प्रश्न निर्माण होतात. म्हाताऱ्या लियरला स्वतःच्या मुलींचे स्वभाव आयुष्यभरात ओळखता आले नाहीत काय? केंटचा जहागीरदार हा प्रामाणिक, निष्ठावान व स्पष्टवक्ता असून त्याचा सल्ला आपल्याला उपयुक्त ठरेल, हे लियरच्या कधीच कसे लक्षात आले नाही? आपल्या भोवतालची माणसे — विशेषतः आपल्या मुली — यांचे स्वभाव ओळखण्याची कुवत नसलेला लियर म्हातारा होईपर्यंत सुखेनेव राज्य कसा करू शकला? राज्याचे वाटे करताना आपल्यावर कोण अधिक प्रेम करते, असा प्रश्न मुलींना विचारणे, त्यांची औपचारिक उत्तरे खरी मानून ती गंभीरपणे घेणे, तिसऱ्या मुलीला व केंटला शिक्षा करणे, असा पोरकटपणा हा म्हातारा राजा कसा करतो? संतापीपणा, लहरीपणा, पोरकटपणा, खुशामतप्रियता, माणसे जोखण्याच्या कुवतीचा अभाव, असे राज्यकर्त्याला मारक दोष असलेला लियर उमरावप्रिय राजा कसा बनला? केंट, ग्लॉस्टर, ऑल्बनी असे उमराव अशा राजावर निष्ठा कसे ठेवू शकले? आपल्या मनात निर्माण होणाऱ्या अशा प्रश्नांची सांगड जेव्हा आपण नाटककाराने नाटकात दिलेल्या पूर्वजीवनासंबंधीच्या निर्देशांशी घालू लागतो तेव्हा नाटकातील व्यक्तींच्या पूर्वजीवनाचा एक आराखडा आपल्या मनात साकार होऊ लागतो.

राज्यकर्ता या नात्याने अनेक दोष असलेला लियर दीर्घकाळ राज्य कसा करू शकला, आणि आपल्या राज्यमंडळातील नरेशांचे आणि जहागीरदारांचे प्रेम, निष्ठा कसा मिळवू शकला याचे उत्तर पुढील प्रकारे देता येऊ शकते. त्याच्या कारकिर्दीत






परचक्र येणे, अंतर्गत बंड होणे, उमरावांच्या सत्तेत आणि अधिकारात सम्राट या नात्याने लियरने ढवळाढवळ केल्यामुळे त्यांच्यात बेदिली निर्माण होणे, त्यांच्यात तट पडणे, केंद्रीय सत्तेविरुद्ध कारवाया केल्या जाणे, त्यामुळे लियरला आपली सत्ता टिकवण्यासाठी युद्धे करावी लागणे, अशा प्रकारच्या घटना घडलेल्या दिसत नाहीत. उमरावांच्या अधिसत्तेत लियरची ढवळाढवळ होत नसली पाहिजे. त्यामुळे उमराव आपापल्या राज्यात सुखासमाधानाने राज्य करीत असले पाहिजेत. लियरच्या न्यायीपणाची सर्वांनाच खात्री आहे. त्याने राज्याच्या केलेल्या वाटण्यांबद्दल ग्लॉस्टर म्हणतो, "वाटण्या इतक्या समतोल आहेत की, त्यांपैकी कोणतीही वाटणी बारकाईने तपासली तरी कोणा एकासाठी म्हणून तिची खास निवड करता येणे अशक्य". (१.१.७१) त्याच्या न्यायीपणामुळेच सर्व उमरावांमध्ये एकोपा राहिला असला पाहिजे आणि त्याचे राज्य सुरळीत चालत राहिले असले पाहिजे. त्यामुळे उमरावांची त्याच्यावर निष्ठा आहे, त्याच्याबद्दल आदर आणि प्रेम आहे. म्हणूनच केंट म्हणतो, "लियर महाराज, मी आपल्याला नेहमीच सन्मानले आपला राजा म्हणून, पिता मानून केले प्रेम, धनी मानून केले अनुसरण, स्मरलो प्रार्थनेमध्ये माझा महान आश्रयदाता समजून –" (१.१.७५)

लियरचा न्यायीपणा, दिलदारपणा, दुसऱ्याच्या अधिकारात दखल न देण्याची वृत्ती यामुळे त्याला जसे शांततापूर्ण आणि संकटमुक्त राज्य करता आले तसेच त्यामुळे त्याच्या स्वभावात काही दोषही निर्माण झाले. लियरसह सर्व उमरावांनी दीर्घ काळ शांततापूर्ण आणि संकटमुक्त राज्य केल्याने, अशांत आणि संकटग्रस्त राज्यातील राज्यकर्त्यात जो सततचा सावधपणा असतो तो कोणाच्याच ठिकाणी राहिलेला दिसत नाही. समोरच्याकडे प्रथम साशंकतेने पाहणे, त्याच्या हेतूंची खात्री करून घेतल्यानंतरच त्याच्यावर विश्वास टाकणे, राज्यकर्त्याच्या या वर्तनपद्धतीची कोणालाच गरज आणि सवय राहिली नाही. यामुळेच राजा लियरचे आणि ग्लॉस्टरच्या जहागीरदाराचे आपल्या अपत्यांबद्दलचे वर्तन बेसावधपणाचे होते. वयाच्या ऐंशी वर्षांपर्यंत दीर्घकाळ संकटमुक्त, निर्वेध सत्ता भोगल्यामुळे लियरला निरंकुशपणे सत्ता भोगण्याची सवय झाली आहे. त्यामुळे त्याने दिलेल्या निर्णयाला होणारा विरोध तो सहन करू शकत नाही. त्याच्या आयुष्यात त्याच्या सत्तेला कधीच आव्हान दिले गेले नसल्यामुळे आणि त्याला अन्य शक्तींपुढे कधीही नमते घ्यावे लागले नसल्यामुळे आपलीच सत्ता अंतिम असल्याबद्दल त्याला खात्री आहे. त्यामुळे त्याने आज्ञा करावी आणि तिचे पूर्णतः पालन व्हावे; त्याने निर्णय द्यावा आणि त्याची त्वरित अंमलबजावणी व्हावी, असे राजेपण भोगण्याची आयुष्यभराची त्याला सवय आहे. उमरावांच्या सत्तेत आणि अधिकारात तो दखल देत नसल्यामुळे इतरांनी आपल्या सत्तेत आणि अधिकारात दिलेली दखल त्याला सहन होऊ शकत नाही. कॉर्डीलिआशी आपले बापाचे नाते तोडल्यानंतर आणि तिला राज्याचा वाटा नाकारल्यानंतर केंटचा जहागीरदार त्याला जेव्हा विरोध करतो तेव्हा लियर संतप्त होऊन त्याला हद्दपारीची शिक्षा देतो. लियरच्या आयुष्यात उमरावाकडून झालेल्या विरोधाचा हा पहिलाच प्रसंग असावा. अशा विरोधाची सवय नसलेला लियर म्हणूनच संतापतो आणि विरोधकाला कडक शिक्षा देतो. त्याला विरोध सहन करण्याची, नमते घेण्याची, तडजोड करण्याची सवय नाही. यातून त्याचा हट्टी स्वभाव घडला आहे. ऐंशी वर्षांच्या या सम्राटामध्ये एक लाडावलेले, हट्टी, आग्रही आणि आपलेच खरे करण्याची वृत्ती असलेले "मूल" दडलेले आहे. लियरमधील या मुलाला खुशामत प्रिय आहे. एका सुरक्षित, संघर्षविहीन, शांततापूर्ण साम्राज्यामुळे त्याचा अधिपती असलेल्या लियरमध्ये एक "लहान मूल" कायमच राहिले आहे.

लहान मुलाचे प्रगल्भ, प्रौढ, सज्ञानी व्यक्तीमध्ये रूपांतर करणारा जीवनसंघर्ष लियरच्या आयुष्यात घडलेलाच नाही. सत्तेने त्याच्याभोवती असा एक कोट उभा केला आहे की जगण्याला आवश्यक असणाऱ्या गरजा भागवण्यासाठी करावा लागणारा संघर्ष त्याच्या वाट्याला कधीच आला नाही. किंबहुना अशी काही परिस्थिती माणसाभोवती असते याची, एखाद्या सुरक्षित बालकाप्रमाणेच त्यालाही कल्पना नाही. असा सत्तेच्या कवचात सुरक्षित रहात आलेला राजा लियर हे कवच गळून जाताच एका भीषण, विरोधी आक्रमक परिस्थितीला सामोरा जातो! उपाशी पोटी प्रथम गॉनरिलच्या आणि नंतर रीगनच्या राजवाड्यातून त्याला बाहेर पडावे लागते आणि त्याच्या डोक्यावर छप्परही उरत नाही.

लियरच्या (आणि ग्लॉस्टरच्या) जीवनाची शोकान्तिका घडते ती त्यांनी आपल्या अपत्यांचा स्वभाव न ओळखल्याने. आपल्या अपत्यांना न पारखता येणे हे लियरच्या आणि ग्लॉस्टरच्या राजेपणाशी, सत्ताधारीपणाशी निगडित आहे. सामान्य माणसाचा त्याच्या अपत्यांशी जसा सातत्यपूर्ण, निकटचा सहवास

अनुक्रमणिका

असतो तसा राजाचा आणि उमरावांचा असत नाही. त्यांच्या अपत्यांचे लालनपालन दायांकडून, दासदासींकडून होते. दिवसातील फार थोडा वेळ ती आपल्या माता-पित्यांच्या सहवासात असतात. मातापित्यांच्या सहवासात असतानाही त्यांच्याशी वागता-बोलताना त्यांना एक अंतर राखावेच लागते. त्यामुळे त्यांच्यात उत्स्फूर्त, अकृत्रिम हृदयसंवाद होऊ शकत नाही. लियरच्या तिन्ही मुली त्याच्याशी बोलताना 'महाराज', 'हुजूर' अशी संबोधने वापरतात. एडमंडही ग्लॉस्टरला अशाच शब्दांनी संबोधितो. गॉनरिल-रीगन लियरला 'सरकार', 'हुजूर' असे संबोधून त्याचा छळ करतात. तेव्हा, आपल्या अपत्यांचा नेमका स्वभाव कसा आहे याची पूर्ण कल्पना राजांना, उमरावांना असण्याचे कारणच नसते. ग्लॉस्टरला तर आपल्या मुलाचे, एडगरचे अक्षरही परिचयाचे नाही. एडमंड जेव्हा एक नकली पत्र एडगरचे म्हणून दाखवतो, तेव्हा ग्लॉस्टर एडमंडला विचारतो, "हे अक्षर तुझ्या भावाचेच याची तुला खात्री आहे?" (१.२.८३) आपल्या अपत्यांचा अल्प परिचय असणे हे लियरच्या आणि ग्लॉस्टरच्या राजेपणाशी, सत्तेशी अपरिहार्यपणे निगडित आहे.

लियरची तिसरी मुलगी कॉर्डीलिआ हे शेंडेफळ आहे. तिच्या जन्मानंतर केव्हा तरी तिची आई निवर्तली. शेंडेफळ असल्यामुळे, आणि मातृविहीन असल्यामुळे कदाचित, लियर तिच्यात अधिक गुंतला आहे. त्यामुळे पहिल्या दोन मुलींपेक्षा तिच्या सहवासात लियर अधिक वेळ रहात असणार. त्याचे तिच्यावर उत्कट प्रेम आहे. तिचेही आपल्यावर असेच उत्कट प्रेम असल्याचा साक्षात्कार तिच्या वर्तनातून झालेला असणार. परंतु त्याला तिच्या स्वभावाचे अन्य विशेष अज्ञातच आहेत. ती मितभाषिणी आहे. एवढेच नव्हे तर आपल्या भावना जाहीरपणे प्रकट करणे तिला जमतही नाही आणि आवडतही नाही. ती प्रेमळ असली तरी त्याबरोबरच ती स्पष्टवक्ती व मूल्यनिष्ठ आहे. तिच्या या स्वभावविशेषाची कल्पना लियरला नाही. ती जर असती तर त्याने आपल्या मुलींना आपल्यावरील त्यांच्या प्रेमाचे वर्णन करण्यास सांगितलेच नसते. या राजेपणामुळेच त्याचे त्याच्या मुलींशी विशिष्ट प्रकारचे संबंध प्रस्थापित झालेले आहेत. कॉर्डीलिआ सोडल्यास उरलेल्या दोन्ही मुलींशी लियरचे घट्ट, अकृत्रिम असे भावनिक संबंध प्रस्थापितच झालेले नाहीत. कॉर्डीलिआही त्याला पूर्णपणे ज्ञात नाही. लियर आणि त्याच्या मुली यांचे विशिष्ट प्रकारचे संबंध हा लियरच्या शोकान्तिकेचा पाया आहे.

राज्यवाटणीच्या प्रसंगात जे आणि जसे घडते ते लियरच्या राजेपणातूनच घडलेले आहे. आपले राज्य मुलींमध्ये वाटण्याआधी त्यांच्यापैकी कोण आपल्यावर अधिक प्रेम करते, असा प्रश्न लियर त्यांना विचारतो. जिचे आपल्यावरचे प्रेम सर्वाधिक असेल, तिला आपण सर्वांत मोठी देणगी देऊ असे आमिषही दाखवतो. ही त्याची कृती एका अर्थी राजेपणाशी संलग्न असलेल्या बालिशपणाची व स्तुतीप्रियतेची आहे. त्याने राज्याच्या केलेल्या तीन वाट्यांपैकी एक वाटा नैसर्गिक संपत्तीने अधिक समृध्द असतो आणि तो आपल्या लाडक्या मुलीला कॉर्डीलिआला देण्याचा त्याचा इरादा असतो. आपल्या मुलींना प्रेमासंबंधी प्रश्न विचारताना कॉर्डीलिआ तिच्या बापावर असलेल्या प्रेमाचे भरभरून वर्णन करील, याची त्याला खात्री असते. दोन्ही मुलींनी केलेल्या वर्णनांनी खूष झालेल्या लियरची कॉर्डीलिआकडून सवाई प्रेमवर्णनाची अपेक्षा असताना ती मात्र तुटक, भावशून्य भाषेत बापावरील आपल्या प्रेमाचे वर्णन करते. राजा हा 'दाता' असतो. त्याने दिलेली 'देणगी' ही त्याची कृपाच असते. ही कृपा होताना उपकृत होणाऱ्याने दात्याच्या मोठेपणाची स्तुती करून त्याच्यावरील आपल्या निष्ठेची ग्वाही द्यायची असते. या प्रकारची सवय लियरला असल्यामुळे आपण कॉर्डीलिआला देत असलेल्या वाट्याच्या तुल्यबल अशा प्रेमवर्णनाची तो तिच्याकडून अपेक्षा करतो. तो म्हणतो, "काय शकतेस तू सांगू, तुझ्या बहिणींना लाभला त्याहून अधिक संपन्न तिसरा भाग स्वतःला मिळवण्यासाठी? बोल." लियरच्या कन्याप्रेमाला राजकुलसंबध्द व्यावहारिकतेची झालर आहे. त्याचे कन्याप्रेम कॉर्डीलिआच्या पितृप्रेमासारखे निरपेक्ष नाही. तिच्या मूळ प्रेमामागे कसलीही अपेक्षा नसल्यामुळे आपल्याला मिळणारा वाटा गमावण्याचा धोका पत्करूनही ती आपल्या स्वभावधर्माशी प्रामाणिक राहते. ती उत्तरते, "काही नाही, महाराज." तिच्या या उत्तराचे लियरला दुःखद आश्चर्य वाटते. "काही नाहीमधून निघेल काही नाहीच. पुन्हा बोल." अशी गर्भित धमकी देऊन तो तिला त्याला अपेक्षित असणारे प्रेमवर्णन करण्याची संधी देतो." मी महाराजांवर करते प्रेम माझ्या अपत्यधर्माशी सुसंगत असलेले; ना अधिक ना कमी." असे जेव्हा कॉर्डीलिआ उत्तर देते तेव्हा लियर तिला मिळणाऱ्या दौलतीची लालूच दाखवीत आपल्या प्रेमवर्णनात सुधारणा करण्याचे सुचवून तिला आणखी एक संधी देतो.". थोडी किंचितशी कर सुधारणा तुझ्या बोलण्यामध्ये, नाहीपेक्षा करून बसशील तू आपल्या दौलतीची नासाडी."







अनुक्रमणिका

असे तो म्हणतो. आपल्या मुलींच्या प्रेमासंबंधीही लियरची ही सौदेबाजी आहे. त्याच्या राजेपणाशी ती संलग्न आहे. लियरच्या पहिल्या दोन मुली जरी राजपरिवारसंलग्न रीतींशी आणि वर्तन-प्रमाणकांशी रुळलेल्या असल्या तरी कॉर्डीलिआने स्वतःला यांपासून वेगळे ठेवले आहे. ती आपल्या वृत्तीशी आणि मूल्यांशी प्रामाणिक आहे. मुलीच्या ठिकाणी असलेला एकूण 'प्रेमाचा ऐवज' पित्यासाठी आणि पतीसाठी आहे. तो केवळ पित्याला देण्याची तिची तयारी नाही. आपल्या दोन्ही बहिणी जर बापावरच सर्वस्वी प्रेम करीत असतील तर त्यांना नवरे हवेतच कशाला, असा तिचा सवाल आहे. ती वक्रतेने म्हणते, "जेव्हा होईन मी विवाहित, तेव्हा माझ्याशी वचनबध्द होणारा पतीचा हात जाईल घेऊन आपल्याबरोबर माझ्या प्रेमाचा अर्धा भाग, अर्धा सेवाभाव, अर्धी कर्तव्यनिष्ठा : मी निश्चितच नाही होणार अशी विवाहित माझ्या बहिणींसारखी सगळे प्रेम बापावर करण्यासाठी." कॉर्डीलिआचे हे उत्तर ऐकून राजा असलेल्या लियरला त्यात तिचा "ताठा"च दिसतो. राजापुढे कोणीही — कन्येनेही — ताठा दाखवू नये, हे राजा असलेल्या लियरचे प्रमाणक आहे. प्रामाणिकपणा, स्पष्टपणा, परखडपणा, नुकसान जरी होत असले तरी स्वतःच्या वृत्तीशी व मूल्यांशी तडजोड न करण्याचा स्वभाव, या कॉर्डीलिआच्या गुणांचा प्रत्यय लियरला या पूर्वी कधीही आलेला नसणार. तिच्या सहवासात असताना तिच्या वर्तनातून आणि मित भाषणातून तिच्या सुकुमार प्रेमाचाच प्रत्यय त्याला येत गेला असणार. तिचे हे परिचित रूप गृहित धरूनच लियर तिच्याकडून तिच्या आपल्यावरील उत्कट प्रीतीच्या वर्णनाची अपेक्षा करतो. तेव्हा त्याच्यासमोर येते तिच्या सुकुमारपणाला विरोधी असे, समोरच्याचा मुलाहिजा न ठेवणारे, स्पष्ट, परखड बोलणाऱ्या कन्येचे रूप! हे लियरला केवळ अनपेक्षित नव्हे, तर धक्का देणारेही आहे. त्यामुळेच, आपण कॉर्डीलिआवर उत्कट प्रेम करीत आलो पण तिने मात्र आपल्यावर कधीच प्रेम केले नाही, याची या क्षणी त्याला खात्री वाटते. अनेक उमरावांच्या उपस्थितीत आपल्या मुलीने असे परखडपणे बोलून आपला अवमान करावा, याचाही त्याला राग येतो. तिरीमिरीत येऊन तो तिच्याशी असलेले आपले बापाचे नाते तोडून टाकतो. तिला राज्याचा वाटा न देण्याचे ठरवतो. या वेळी त्याचा निष्ठावंत मांडलिक केंटचा जहागीरदार कॉर्डीलिआची बाजू घेऊन लियरच्या निर्णयांना विरोध करतो. तेव्हा लियर त्यालाही हद्दपारीची शिक्षा फर्मावतो.

लहान मुलांना जसे त्यांना प्रिय असलेल्या व्यक्तीकडून कौतुक करून घ्यावेसे वाटते आणि अपेक्षेप्रमाणे त्यांचे कौतुक झाले नाही तर ती जशी रुसतात, रागावतात, अबोला धरतात, तसेच लियरचे कॉर्डीलिआशी झालेले वर्तन आहे. कॉर्डीलिआकडून अपेक्षाभंग झाल्यावरचे त्याचे संतप्तपणाचे वर्तन त्याच्यातील हट्टी, आक्रस्ताळी, बालिशपणाचाच आविष्कार आहे. त्याच्या या कृतीमागे भावनिक प्रगल्भतेचा व विवेकीपणाचा अभाव आहे.

परंतु राजा लियरमध्ये केवळ लहान मूल नाही. त्याच्या व्यक्तिमत्त्वाला राजकारणातील प्रगल्भ शहाणपणाचा एक पदरही आहे. आपल्या हयातीतच आपल्या मुलींमध्ये आपले राज्य वाटून टाकणे त्याला इष्ट वाटते. तो म्हणतो, "आम्ही आहे आता ठरवलेले आमच्या कन्यांचे विशिष्ट स्त्रीधन याच घटकेला जाहीर करण्याचे, भावी संघर्ष आधीच लक्षात घेऊन." आपण अधिक वृध्द झालो किंवा आपण मेलो तर राजमुकुटासाठी आपल्या मुलींत संघर्ष होईल, हे त्याने ओळखले आहे. गॉनरिल व रीगन यांच्या स्वार्थीपणाचा त्याला अंदाज असणार. रीगनचा नवरा कॉर्नवालचा नरेश याची लियरच्या दरबारात सदैव ऊठबस असल्याने त्याचे स्वार्थप्रेरित, निर्दय राजकारण त्याच्या लक्षात आले असले पाहिजे. तसेच गॉनरिलचा नवरा ऑल्बनीचा नरेश याचाही सुस्वभाव त्याला जाणवला असला पाहिजे. त्यामुळे दरबारी राजकारणात लियरचा कल कॉर्नवालऐवजी ऑल्बनीकडे झुकलेला असणार. म्हणूनच नाटकाच्या प्रारंभी केंट म्हणतो, "मला वाटायचे, कॉर्नवालच्या नरेशापेक्षा ऑल्बनीच्या नरेशावर महाराजांची अधिक मर्जी." याला ग्लॉस्टरही सहमती दर्शवितो. तेव्हा रीगन आणि कॉर्नवाल हे दाम्पत्य राजमुकुटासाठी तंटाबखेडा उद्या करतील अशी भीती लियरच्या मनात असणार. म्हणूनच आपल्या हयातीतच राज्याच्या वाटण्या करून टाकण्याचा निर्णय त्याने घेतलेला आहे. आपल्या पहिल्या दोन मुलींबद्दल त्याच्या मनात कोठेतरी साशंकता आहे. म्हणून आकारमानाने समान पण साधनसंपत्तीच्या दृष्टीने समृध्द असलेला भाग कॉर्डीलिआला द्यावा आणि आपण तिच्याजवळच राहावे असा विचार त्याने केला आहे.

आपल्या मुलींच्या आपल्यावरील प्रेमासंबंधी त्याच्या विचारण्याला मुत्सद्दीपणाची एक बाजूही आहे. आपल्यावरील प्रेमाचे कॉर्डीलिआ अधिक सरस वर्णन करणार आणि आपण तिला राज्याचा अधिक समृध्द भाग देऊ शकणार याची त्याला खात्री आहे. कॉर्डीलिआला राज्यवाटणीत झुकते माप दिल्याची



अनुक्रमणिका

मुलींनी किंवा उमरावांनी तक्रार केल्यास, तिने आपल्यावरील प्रेमाचे अधिक सरस वर्णन केल्याचे कारण देण्याची सोय तो करून ठेवीत आहे. राज्याच्या समान आकारमानाच्या वाटण्या करून तो आपला न्यायीपणा सिध्द करू पाहतो आणि सर्वात निसर्गसमृध्द भाग कॉर्डीलिआला देऊन तो आपल्यावरील तिच्या प्रेमाचे तिला बक्षिसही देऊ पाहतो. तसेच आपणांस तिच्याकडे राहता यावे याची तरतूदही तो करू पाहतो. असा दूरदर्शीपणा आणि मुत्सद्दीपणा त्याच्या व्यक्तिमत्त्वात असल्यामुळेच वयाच्या ऐंशी वर्षांपर्यंत तो उमरावांत लोकप्रिय राहून निष्कंटकपणे राज्य करू शकला. परंतु त्याची ही योजना यशस्वी होऊ शकत नाही. त्याची प्रिय कन्याच ती उद्‌ध्वस्त करते.

लियरच्या "सुखाची रास" असलेली व सुकुमारपणे प्रेम करणारी कॉर्डीलिआ राज्यवाटणीच्या प्रसंगी इतक्या कोरडेपणाने व भावशून्यतेने का वागते, बोलते, हेही येथे समजून घेतले पाहिजे. आपल्या मुलींना प्रेमासंबंधी प्रश्न विचारणे तिला आवडले नाही. कारण भावनांची प्रदर्शनखोरी तिला पसंत नाही. आपल्या बहिणींबरोबर ती लहानाची मोठी झाली असल्याने त्या कशा आहेत हे तिला माहीत आहे. लियरने तिच्याशी नाते तोडल्यावर व फ्रान्सच्या राजाबरोबर निघून जाताना ती आपल्या बहिणींना म्हणते, "अहो आमच्या वडिलांच्या रत्नांनो, .... मी ओळखते तुम्ही काय आहात ते. बहीणच असल्यामुळे मी आहे फार नाखूष तुमच्या दोषांचा खऱ्या नावांनी उल्लेख करायला." (१.१.८०) त्यांचे आपल्या वडिलांवर प्रेम नाही, याचीही तिला कल्पना आहे. म्हणून ती उपरोधाने म्हणते, "करा वडिलांवर पुरेपूर प्रेम. मी त्यांना आहे सोपवीत तुम्हीच वर्णिलेल्या तुमच्या अंतरंगावर". (१.१.८०) आणि शेवटी ती म्हणते की, माझ्या वडिलांची जर अजूनही माझ्यावर मर्जी असती तर मी त्यांना राहण्यासाठी दुसरे चांगले ठिकाण सुचवले असते. आपल्या बहिणी बापाशी नीट वागणार नाहीत याची तिला खात्री आहे. अशात आपला बाप त्यांना प्रेमासंबंधी निरर्थक प्रश्न विचारतो, आपल्या बहिणीही बापावरील आपल्या प्रेमाचे नाटकी, खोटे आणि अतिशयोक्त वर्णन करतात, बापही ते स्वीकारून खूष होतो, ही संपूर्ण घटनाच तिला आवडलेली नाही. त्यामुळे ती या घटनेत भावनाशून्यतेने आणि कोरडेपणाने सहभागी होते. आपल्या औपरोधिक बोलण्यातून ती आपली नापसंती सुचवते. बापावरील प्रेमाबद्दल आपल्या बहिणी खोटे बोलत असल्याचे ती लियरच्या निदर्शनाला आणते. ती म्हणते, "कशाला हवे असतात माझ्या बहिणींना त्यांचे नवरे, जर त्या म्हणतात तशा करीत असतील सर्व प्रेम फक्त आपणांवर." (१.१.७४) परंतु कॉर्डीलिआवर संतप्त झालेला लियर तिच्या या बोलण्यातील अंतःस्वराकडे लक्ष देण्याच्या मनःस्थितीत नाही. कॉर्डीलिआच्या भावनाशून्यतेने व कोरडेपणाने दुखावलेला लियर तिरीमिरीत येऊन आपली योजना उधळून टाकतो. सकृद्दर्शनी पोरकटपणाची वाटणारी लियरची मुलींना प्रश्न विचारण्याची कृती, तिच्यातील सूचक निर्देश जर लक्षात घेतले तर, मुत्सद्दीपणाची वाटते.

जी मुलगी आपल्यावर सर्वाधिक प्रेम करते तिला आपण सर्वात मोठी देणगी देऊ, असे आश्वासन जरी लियरने दिले असले तरी त्याने ते पाळलेले नाही. वस्तुतः आपल्या तिन्ही मुलींचे प्रेमवर्णन ऐकल्यानंतर या तीन मुलींपैकी जिच्या वर्णनातून अधिक प्रेम प्रकट होईल तिलाच त्याने 'सर्वात मोठी देणगी' देणे आवश्यक होते. परंतु लियर हे करण्याचे टाळतो. त्या ऐवजी तो पहिल्या दोन मुलींना त्यांचे प्रेमवर्णन करून होताच त्यांचा त्यांचा वाटा देऊन टाकतो. कोणत्या मुलीला कोणता वाटा द्यायचा हे त्याने आधीच ठरवलेले आहे. कॉर्डीलिआ आपले प्रेम अधिक सरसपणे व्यक्त करील आणि तिसरा निसर्गसमृध्द वाटा तिला देण्यामध्ये कसलीच अडचण येणार नाही, असा त्याचा कयास असतो.

दोन्ही मुलींना त्यांचे त्यांचे वाटे देऊन टाकावेत; कॉर्डीलिआला निसर्गसंपन्न वाटा देऊन तिचे लग्न होईपर्यंत तिच्या सहवासात राहावे अशी त्याची योजना आहे. केवळ कॉर्डीलिआच्या उत्तराने आपली ही योजना बारगळल्याचे त्याला दुःख आहे. विरोध करणाऱ्या केंटला तो म्हणतो, "केंट गप्प राहा! ड्रॅगन आणि त्याचा क्रोध यांच्यामध्ये नको येऊस. तीच होती सगळ्यात लाडकी आणि तिच्याच लालनपालनासाठी ठरविले होते सर्वस्व वेचायचे." (१.१.७५) या बोलण्यातून तो आपली योजना सूचित करतो. परंतु ती विफल होताच ऐनवेळी त्याला आपली योजना आमूलाग्र बदलावी लागते. आपली योजना ऐनवेळी बदलत असतानाही त्यात त्याची दूरदृष्टी आणि मुत्सद्दीगिरी प्रकट होते. कॉर्डीलिआशी संबंध तोडल्यावर आता त्याला गॉनरिल-रीगन यांच्याकडे राहावे लागणार आहे. त्या आपल्याला कशा वागवतील याबद्दल तो साशंक आहे. म्हणून लियर आपल्या सुरक्षिततेची एक नवी व्यवस्था करतो. मुलींच्या खर्चाने शंभर शिलेदार बाळगण्याचा हक्क तो स्वतःकडे ठेवतो. तसेच आपले 'राजा' हे अभिधान

आणि सर्व राजबिरुदे स्वतःकडे राखून ठेवतो. जर आपल्या मुलींनी आपल्याला नीट वागवले नाही तर शंभर शिलेदारांच्या मदतीने तो आपले संरक्षण करू शकेल. त्यांच्या द्वारा अन्य नरेशांशी आणि जहागीरदारांशी संपर्क साधून त्यांना त्यांच्या फोजांसह आपल्या बाजूला उभे करू शकेल. त्यांच्या साह्याने पुन्हा सर्व सत्ता आपल्या ताब्यात घेऊ शकेल. राजा हे अभिधान आणि राजबिरुदे स्वतःकडे राखून, अद्यापही लियरच राजा आहे, असा प्रजेचा समज तो कायम ठेवू पहात आहे. त्यामुळे उद्या प्रसंग पडला आणि त्याला पुन्हा सत्ता ताब्यात घ्यावी लागली तर या गोष्टीला तो प्रजेचा पाठिंबा मिळवू शकेल, अशा तरतुदी करून त्याने अंतिम सत्ता सुप्त रूपाने आपल्याकडेच राखली आहे. पुढे जेव्हा त्याच्या मुली त्याचा छळ करतात आणि त्याचे शिलेदार काढून घेऊ लागतात तेव्हा तो म्हणतो, "मी तुम्हांला सर्वस्व दिले... तुम्हाला बनवले माझे व्यवस्थापक, माझे विश्वस्त, पण ठेवला इतक्या संख्येचा लवाजमा बाळगण्याचा हक्क." (२.४.१२२) आपण आपल्या मुलींना आपली अंतिम, निर्णायक सत्ता दिली नाही, हेच तो येथे सुचवीत आहे. आपण अजूनही "राजे"च आहोत, असे त्याचे म्हणणे आहे. या नाटकाच्या शेवटच्या भागात एडमंड ऑल्बनीला उद्देशून लियरबद्दल म्हणतो, "त्यांचे वृध्दत्व, त्यातूनही त्यांची किताबत यात आहे जादूचे सामर्थ्य सामान्य हृदये आपल्याकडे खेचण्याचे, आणि आमचे पगारी भाले त्यांच्यावरती हुकूमत चालवणाऱ्या या आमच्या डोळ्यांवर उलटविण्याचे." (५.३.१७८-१७९) आपल्या राजेपणाच्या अभिधानात राजमंडलच नव्हे तर सामान्य प्रजाजनांनाही आपल्या बाजूने उभे करण्याची ताकद आहे, याची कल्पना लियरला असल्यामुळेच सावधगिरी म्हणून त्याने ही उपाययोजना केली आहे. त्याच्या या चालीमुळे आपण आपल्या दोन्ही मुलींवर वचक ठेवू शकू, असेही त्याला वाटत असणार.

विषयांतर करून येथे एक मुद्दा स्पष्ट केला पाहिजे. वस्तुतः लियरने आपली सत्ता आपल्या मुलींना देण्याचे ठरवले आहे परंतु प्रत्यक्षात ती तो जावयाकडे सुपूर्द करतो. शंभर शिलेदारांचा लवाजमा ठेवण्याच्या आणि सर्व बिरुदे स्वतःकडे राखण्याच्या अटीही तो जावयांना सांगतो. नंतर मात्र लियरने दिलेल्या सत्तेचा उपभोग जावई नव्हे तर मुली घेत असल्याचे शेक्सपियरने दाखवले आहे. शंभर शिलेदारांचा लवाजमा बाळगण्याची अट लियरचे जावई नव्हे, तर त्याच्या मुलीच मोडतात. लियरही आश्रयाची अपेक्षा जावयांकडून नव्हे तर आपल्या मुलींकडून करतो. तेव्हा या नाटकाच्या प्रारंभिक प्रवेशात लियरचे सत्ता जावयांकडे सोपवणे हे एकूण नाटकाशी सुसंगत वाटत नाही.

दरबारात राजमंडळासमक्ष राज्याचे वाटे मुलींना देताना त्याला आणखी एक गोष्ट साधायची आहे. स्वार्थी, सत्तालोलुप मुलींना, त्यांचे बापावर निरतिशय प्रेम असल्याचे जाहीर करायला लावले की, नंतर, दुर्लौकिकाच्या भीतीने त्यांना बापाशी वाईट वागणे जड जाईल आणि आपली सुरक्षितता, आपले सुख सांभाळले जाईल, असा त्याचा कयास आहे. या उप्परही त्या जर वाईट वागल्या तर नरेशांची आणि जहागीरदारांची सहानुभूती आपल्या बाजूने वळवता येईल; असाही एक राजकीय शहाणपणाचा हेतू लियरचा पोरकटपणा दर्शविणाऱ्या या घटनेला आहे. परंतु नंतर लियर आणि गॉनरिल-रीगन यांच्या संघर्षपूर्ण संबंधांना असे रूप मिळते की, त्याला राजमंडळ आपल्या बाजूने वळविण्याची संधीच मिळत नाही. कॉर्डीलिआशी नाते तोडून आणि लियरसाठी जान कुर्बान करायला सिध्द असणाऱ्या केंटच्या जहागीरदाराला हद्दपार करून प्रारंभीच लियरने आपली ताकद संपविली आहे. आणि नंतर त्याच्या दोन्ही मुलींनी त्याला सत्तापुनर्प्राप्तीची संधीच मिळू दिली नाही.

मुलींना सत्ता देताना सत्तेतील हुकुमाचा एक्का स्वतःच्या हातात राखण्याची लियरची चाल त्याच्या मुत्सद्दीगिरीची आणि राजकीय शहाणपणाची जशी निदर्शक आहे तसेच ती त्याच्या सत्ताप्रेमाची आणि सत्ताकेंद्री व्यक्तिमत्त्वाचीही निदर्शक आहे. आपण राजे आहोत आणि आपल्या निर्णयाला विरोध करणाऱ्याला दंडण्याचा आपल्याला अधिकार आहे, ही गोष्ट त्याच्या हाडीमांसी इतकी खिळली आहे की, राजमुकुट दोन मुलींमध्ये वाटून देऊन सत्तात्याग केल्यावरही तो आपल्या निर्णयाला विरोध करणाऱ्या केंटला हद्दपारीची शिक्षा सुनावतो. ती सुनावताना तो आपले राजेपण पुढीलप्रमाणे व्यक्त करतो. "... ज्या अर्थी अतिरिक्त अहंभावाने तू आलास आम्हांला आडवा आमचा अधिकार व आमचा हुकूम या दोहोंमध्ये, जी गोष्ट आहे असह्य आमच्या स्वभावाला व आमच्या स्थानाला, त्या अर्थी आमच्या अधिसत्तेचा प्रत्यय म्हणून ही घे तुझी बक्षिसी..." (१.१.७६) आपल्या अधिकाराला व हुकूमाला विरोध आपल्या स्वभावाला असह्य होतो हे तो सांगतो. अधिकार गाजवणे, विरोधकाला शासन करणे हा लियरचा स्वभावच आहे. खरे

म्हणजे केंटला शिक्षा देण्यापूर्वी त्याने सत्तात्याग केलेला आहे. तरीही आपण सत्ताधारी असल्याचे गृहीत धरून तो केंटला शासन करतो. स्वामिनिष्ठ असल्यामुळे केंटही ही शिक्षा स्वीकारतो. लियरने राज्याच्या वाटण्या केल्या पण अंतिम सत्ता सोडलेली नाही याचेच, त्याचे हे वर्तन निदर्शक आहे.

आपण राजे असून आपल्या मनाविरुध्द घडणारी, आपल्याला नापसंत असलेली कोणतीही गोष्ट आपण सहन करणार नाही; आपल्या विरुध्द वागणाऱ्याला आपण शासन करूच, ही लियरची वृत्ती आहे. कॉर्डीलिआने प्रकट केलेले प्रेम त्याच्या मनासारखे नव्हते. तिला कठोर शासन करायला तो चुकला नाही. लियर आपल्या या मुलीशी अतिशय कठोरपणे वागतो. तिच्याशी असलेले नाते तोडुन त्याचे समाधान होत नाही. तिचे लग्न जुळू नये म्हणूनही तो प्रयत्न करतो. तिला मागणी घालायला आलेल्या बर्गंडीला तो म्हणतो की, "आमच्या शापाचे स्त्रीधन" लाभलेल्या कॉर्डीलिआला "तिने कमावलेल्या सर्व वैगुण्यांसमवेत तुम्ही स्वीकारणार की अव्हेरणार?" (१.१.७४) या बोलण्यातून "तुम्ही तिला अव्हेरा!" अशी आज्ञाच लियर देत आहे. फ्रान्सचा राजा जेव्हा लियरला कॉर्डीलिआत जाणवलेले दुर्गुण हे सद्‌गुणच आहेत अशी भूमिका घेतो तेव्हा ती फ्रान्सला गेली तर बरेच; त्यामुळे तिचे तोंड पुन्हा पाहण्याचे दुर्भाग्य आपल्या नशिबी येणार नाही, अशी प्रतिक्रिया तो देतो. फ्रान्सच्या राजाबरोबर तिचे लग्न लावून देणे तर दूरच; पण राजा असलेल्या फ्रान्सला सन्मानपूर्वक निरोप देण्याचाही राजशिष्टाचार तो पाळत नाही. त्याने कॉर्डीलिआचा पती म्हणून स्वीकार केल्याचा राग तो अशा प्रकारे प्रकट करतो. त्याचे हे निर्दयपणाचे वागणे त्याच्या सत्ताप्रेरणाप्रभावित व्यक्तिमत्त्वाला साजेसेच आहे.

लियरच्या व्यक्तिमत्त्वातील अंगभूत सत्ताप्रेरणा आणि सत्ताप्राप्तीनंतर जागृत झालेली गॉनरिल व रीगन या त्याच्या मुलींतील सत्ताप्रेरणा यातील संघर्ष हे या नाटकाचे प्रधान सूत्र आहे. त्यासाठी लियरच्या सत्ताकेंद्री व्यक्तिमत्त्वाची प्रस्थापना करणे शेक्सपियरला आवश्यक वाटलेले आहे. ते त्याने या नाटकाच्या आरंभिक भागात बारकाईने केलेले आहे. लियरच्या प्रारंभीच्या सत्ताजन्य कृती कॉर्डीलिआ-केंट-फ्रान्स यांच्या संदर्भात घडतात. त्या घडत असताना या केंद्रीय सत्तासंघर्षातील प्रतिद्वंद्वी गॉनरिल व रीगन तटस्थ असतात. जेव्हा लियरची सत्ता या दोघींमध्ये विभागली जाते तेव्हा लियरच्या प्रतिद्वंद्वी म्हणून त्यांचा या संघर्षात प्रवेश होतो. या नाटकाच्या नाट्यारंभिक प्रवेशाचा शेवट गॉनरिल आणि रीगन यांच्यातील सत्ताप्रेरणेच्या अभिव्यक्तीने होतो. लियरसह सर्वजण निघून गेल्यानंतर गॉनरिल-रीगन यांच्यात झालेले संभाषण सत्तासंघर्षाच्या प्रस्थापनेच्या दृष्टीने फार महत्त्वाचे आहे. आपल्या दोघींकडे आलटून-पालटून राहू लागणाऱ्या राजा लियरशी आपण दोघींनी कसे वागायचे, यासंबंधी या दोघी खलबते करतात. कॉर्डीलिआ आणि केंट यांच्याशी झालेल्या लियरच्या वर्तनाने या दोघी सावध झाल्या आहेत. लियरचे प्रिय कन्येशी नाते तोडणे आणि स्वामिनिष्ठ केंटला हद्दपार करणे, यांची नोंद या दोघींनी घेतली आहे. "केंटच्या या हद्दपारीसारखे झटके आपल्याही वाट्याला येऊ शकतील" (१.१.८१) असे यावर रीगन म्हणते. त्याला गॉनरिल सहमती दर्शविते. गॉनरिल म्हणते, "आता आहेत त्याच मनःस्थितीत जर ते अधिकार गाजवू लागले तर त्यांनी नुकताच केलेला सत्ता-त्याग हा आपणांला अपायकारक ठरायचा" (१.१.८१) याला रीगन सहमती दर्शविते. गॉनरिल पुढे म्हणते, "आपण काहीतरी केलेच पाहिजे; आणि तेही तापलेले आहे तेवढ्यात." (१.१.८१) लियरचे "अधिकार गाजवणे" या दोघींना धोकादायक वाटते. वस्तुतः त्यांच्याकडे सत्ता आल्यानंतर म्हाताऱ्या लियरच्या अधिकार गाजविण्याची त्यांना भीती वाटायचे काहीच कारण नाही. तरीही त्यांना ती वाटते कारण लियरने आपल्याकडे ठेवलेला 'राजा' हा किताब, राजबिरुदे आणि विशेष म्हणजे शंभर शिलेदार बाळगण्याचा राखलेला हक्क हे धोकादायक ठरू शकते याची त्यांना कल्पना आहे. तेव्हा प्रथम आणि लवकरात लवकर लियरला पूर्णतः सत्ताविहीन करून संपूर्ण सत्ता आपल्या ताब्यात घेतली पाहिजे, हा विचार दोघींच्या डोक्यात आहे.

'कुत्र्याला ठार करण्याआधी तो पिसाळला आहे असे जाहीर करावे लागते' या न्यायाने या दोघी लियरबद्दल बोलतात. लियर म्हातारपणी 'अस्थिर, अविचारी' झाला आहे, त्याला 'म्हातारचळ' लागला आहे; प्रारंभापासून त्याचा स्वभाव "अतिरेकी" आहे; त्यात व्याधिग्रस्त आणि शीघ्र संतापी वृध्दत्वामुळे त्याच्या ठिकाणी "दुर्दम्य हट्टीपणाही" आलेला आहे; त्याला "लहरीपणाचे झटके" येतात. अशी ज्याची मनःस्थिती झाली असेल त्याच्या हाती अधिकार गाजवण्याची शक्ती असणे योग्य ठरणार नाही; ती कोणालाही घातक ठरू

शकेल, असे त्यांचे म्हणणे आहे. या प्रकारचा युक्तिवाद करून या दोघी आपल्या आगामी कृत्यांना नैतिक अधिष्ठान मिळवून देऊ पहात आहेत. राजमंडळात आणि प्रजेमध्ये "म्हातारपणामुळे मती ठिकाणावर नसलेला राजा" अशी लियरची प्रतिमा उभी करून संपूर्ण सत्ता आपल्या ताब्यात घेण्याची त्यांची योजना आहे. हे कार्यही त्यांना "तापलेले आहे तेवढ्यात" करायचे आहे. कॉर्डीलिआ व केंट यांच्याशी झालेले लियरचे वागणे पाहून राजमंडळातील उमराव अस्वस्थ झाले असणार. ही अस्वस्थता ताजी असेपर्यंत जर लियरची मती ठिकाणावर नसल्याचे दर्शविता आले तर राजमंडळ आपल्या बाजूला उभे राहील, असे दोघींना वाटत असल्यामुळेच जे काही करायचे ते "तापलेले आहे तेवढ्यात"च करणे त्यांना आवश्यक वाटते. नंतरही या दोघींचे वर्तन या योजनेबरहुकूम होते. लियरकडे असलेली उर्वरित आणि अंतिम स्वरूपाची सत्ता काढून घेण्याच्या दिशेने नाटकाची वाटचाल सुरू होते.

– ३ –

लियर आणि त्याच्या दोन मुली यांच्यातील सत्तासंघर्षाचा विचार आपण पुढे करणार आहोत. त्या आधी या नाटकात शेक्सपियरने उभ्या केलेल्या दुसऱ्या समांतर नाट्याचा आपण विचार करू.

लियर आणि त्याच्या मुली यांच्यातील नाट्याला ग्लॉस्टरचा जहागीरदार, त्याचा अनौरस मुलगा एडमंड आणि औरस मुलगा एडगर यांच्यातील नाट्याचा एक समांतर पदर जोडला गेला आहे. हे नाट्यही सत्ताप्रेरणेतून घडलेले आहे. सत्तेच्या नाट्याचे हे दोन पदर कधी एकमेकांना पूरक, तर कधी विरोधी होत, तर कधी एकमेकांत गुंफले जात विनाशाच्या एकाच दिशेने पुढे सरकतात. त्यांच्यातील ही नाती एकमेकांना अर्थसमृध्द बनवतात.

ग्लॉस्टर आणि त्याचा अनौरस मुलगा एडमंड यांच्या परिचयाने *राजा लियर* या नाटकाला सुरवात होते. ग्लॉस्टरचा औरस मुलगा एडगर याच्या जन्मानंतर एका वर्षाने एडमंडचा जन्म झाला आहे. अनौरस असूनही ग्लॉस्टरने त्याला आपला मुलगा म्हणून स्वीकारले आहे. तो नऊ वर्षे परदेशात असल्यामुळे त्याच्या वाढाळू वयात तो बापाच्या सहवासात नसल्यामुळे बापाचे त्याच्यावर संस्कार झालेले नाहीत. तसेच ग्लॉस्टरला त्याचा स्वभावही अपरिचित आहे. आपला अनौरस मुलगा आपला द्वेष करतो याची त्याला कल्पना नाही.

नाटकाच्या सुरवातीला ग्लॉस्टर आपल्या अनौरस मुलाची केंटशी ओळख करून देतो. ती देताना एडमंडच्या आईबद्दल तो एडमंडसमोर कुचेष्टेने आणि असभ्यपणे बोलतो. एडमंडची आई कमनीय कशी होती, एडमंडला घडवताना तिच्याबरोबरचा आपला शृंगार-खेळ कसा रंगला होता, एडमंडच्या आईने गर्भ कसा पकडला, तिचे पोट गोलाकार कसे झाले, तिच्या पलंगाला पती भेटण्याआधी पाळण्यात पोरगा कसा भेटला, हे सर्व तो निर्लज्जपणे आपल्या तरुण पोरासमोर सांगतो. याचा एडमंडच्या मनावर परिणाम होऊन त्याच्या बापाच्या द्वेषभावनेत भरच पडली असणार. अनौरसपणामुळे समाजात प्रतिष्ठा नाही; तसेच, बापाच्या धनावर अधिकार नसल्याने आर्थिक आधार आणि सुरक्षितता नाही; बापाचे आपण लाडके, कारण आपल्या अस्तित्वामुळे बापाला आपल्या आईच्या कमनीयतेची आणि शृंगारक्रीडांची आठवण होते. या कारणांमुळे तो बापाचा द्वेष करतो. अनौरसपणामुळे येणारी निराधारत्वाची भावना बालपणापासून भोगली असल्यामुळे स्वतःचे नशीब स्वतःच्या कर्तृत्वबळावर घडविण्याची प्रेरणा त्याच्या ठिकाणी निर्माण झाली आहे. ग्रहताऱ्यांच्या प्रभावावर त्याचा विश्वास नाही. बापाची जमीन-जायदाद आणि जहागीरदारपद बळकावणे हे त्याचे उद्दिष्ट आहे. त्यासाठी त्याने एक कपटकारस्थान रचले आहे. एडगरने एडमंडला उद्देशून लिहिलेले असे एक बनावट पत्र तो तयार करून ते बापाच्या नजरेला पडेल याची तरतूद करतो. त्यात आपण दोघे बापाची जायदाद बळकावून वाटून घेऊ, या आशयाचा मजकूर असतो. ग्लॉस्टर संतप्त होऊन एडगरवर नजर ठेवण्याची कामगिरी एडमंडवर सोपवतो. नंतर एडमंड स्वतःच स्वतःला जखमी करून घेऊन, आपण एडगरच्या कारस्थानाला विरोध केल्यामुळे त्याने आपणांस ठार करण्याचा प्रयत्न केला असे ग्लॉस्टरला भासवतो. ग्लॉस्टर एडगरला पकडण्याचा हुकूम देतो. एडगर अर्धनग्न भिकाऱ्याचा वेष घेऊन आणि वेड्याचे सोंग वठवीत "टुकार टॉम" या नावाने वावरू लागतो.

विनम्रभावाने गोड बोलणे; बोलण्यात कोणावरही आपण आरोप करीत नाही, प्रत्येकाला समजून घेऊन, त्याच्यावर अन्याय होणार नाही याची दक्षता घेत आपण प्रत्येकाविषयी वागतो-बोलतो असे भासवणे; ज्याच्याशी आपण बोलतो आहोत त्यांच्याबद्दल आदर, प्रेम आणि कळकळ प्रकट होईल याची दक्षता घेणे; अशा वागण्याबोलण्यातून आपली एक विनम्र,

सज्जन, आणि मूल्यपालक प्रतिमा उभी करणे; ही एडमंडची पध्दती आहे. अशा प्रकारचे वागणे-बोलणे हे त्याचे हत्यार आहे. या पध्दतीमुळे तो आपले स्वार्थी हेतू आणि अनैतिक प्रेरणा यशस्वीपणे झाकतो. त्याच्या या पध्दतीच्या बोलण्यामुळे प्रत्येकाला तो 'आपला' वाटतो. त्यामुळे त्याच्याशी बोलणारे त्याच्यापुढे आपले मनोगत, इच्छा आणि योजना मनमोकळेपणे उघड करतात. या मार्गाने दुसऱ्याच्या जाणून घेतलेल्या मनोगतांचा वापर तो आपल्या हितसंबंधांसाठी करतो. ग्लॉस्टर, एडगर, कॉर्नवाल, गॉनरिल, रीगन या सर्वांशी वागताना त्याने याच पध्दतीचा अवलंब केला आहे. याच पद्धतीचा वापर करून तो ग्लॉस्टरकडून फ्रेंच सैन्याची आणि फ्रान्सवरून आलेल्या गुप्त पत्राची माहिती मिळवतो. "आपण महाराजांचा पक्ष घेतला पाहिजे. मी त्यांना मिळणार आहे आणि गुप्तपणे मदतही करणार आहे." (३.४.१३१) ह्या ग्लॉस्टरच्या मनोगतासह, ती मिळवलेली माहिती कॉर्नवालला पुरवतो. ती पुरवताना आपल्या कृत्याला मूल्याचा मुलामा द्यायला तो विसरत नाही. तो कॉर्नवालला म्हणतो, "स्वामिनिष्ठेपुढे पितृप्रेमाने अशी माघार घेतलेली पाहून लोक माझ्याबद्दल काय बोलतील याचा विचार केला की, मला भीती वाटू लागते." (३.५.१३७) त्याच्या या बोलण्यावागण्यामुळे ग्लॉस्टरला राजद्रोहाबद्दल अटक करण्याचा आणि स्वामिनिष्ठा दर्शविल्याबद्दल एडमंडला ग्लॉस्टरची जहागीर देण्याचा निर्णय कॉर्नवालचा नरेश घेतो आणि एडमंडचे हे कारस्थान यशस्वी होते.

सत्तेच्या नाट्याच्या या दोन्ही रूपांचा पिता-अपत्यसंबंध हा पाया आहे. या संबंधांची मूल्ये गृहीत धरूनच दोन्ही ठिकाणी पिता आपल्या अपत्यांशी वागतो. एडगर आपली जायदाद बळकावण्याचे कारस्थान रचत असल्याचे जेव्हा एडमंड ग्लॉस्टरला सांगतो तेव्हा आपल्या पोटच्या मुलाने असे कारस्थान रचावे, याचा ग्लॉस्टरला संताप येतो. तो म्हणतो, "तो इतका अमानुष राक्षस असणे... आणि तेही बापाच्या संबंधात, ज्याची त्याच्यावर इतकी माया, इतके अपरंपार प्रेम. हर हर." (१.२.८४) एडमंडवरही त्याचा असाच विश्वास आहे. फ्रान्सच्या सेनेबद्दल, फ्रान्समधून आलेल्या गुप्त पत्राबद्दल आणि आपण लियरला मदत करणार असल्याबद्दल तो एडमंडला याच विश्वासापोटी माहिती देतो. त्याचे डोळे फोडले जातात. कॉर्नवालचा सूड घेण्यासाठी तो एडमंडलाच साद घालतो. (३.७.१४५) आणि त्याला असे कळते की, ज्याच्यावर पुत्र म्हणून आपण विश्वास ठेवला तोच आपला द्वेष करतो, जहागीरदारपदासाठी त्यानेच आपल्या आणि एडगरच्या विरुध्द कारस्थान केले.

पिता-अपत्य-संबंध हा नैसर्गिकरीत्याच परस्परप्रेमाचा, विश्वासाचा संबंध असतो, हे ग्लॉस्टरने गृहीतच धरलेले आहे. एडगर जायदादीसाठी तुमच्या विरुध्द कारस्थान करतो, असे जेव्हा एडमंड त्याला सांगतो तेव्हा चकित आणि संतप्त झालेला ग्लॉस्टर म्हणतो, "इथे मुलगा आपल्या बापाविरुध्द. महाराजही आपल्या निसर्गदत्त स्वभावधर्मापासून ढळले. तिथे बाप आपल्या मुलीविरुद्ध." (१.२.८४) आपल्या राजेपणाच्या आणि सत्तेच्या अहंकारापोटी लियर आपल्या मुलीशी असलेले नैसर्गिक नाते तोडतो. तरीही तो गॉनरिल-रीगनकडून पिता-अपत्य-प्रेमसंबंध सांभाळण्याची अपेक्षा करतो. त्या आपला कन्याधर्म पाळतील; त्यांच्या ठिकाणी नैसर्गिक पितृप्रेम असणारच, हे गृहित धरूनच तो उचित सावधगिरी बाळगून आपले राज्य त्यांना वाटून देतो. या गृहितकाच्या आधारेच तो, आपल्यावर कोणाचे अधिक प्रेम आहे ते सांगा, असे मुलींना विचारतो. त्याच्या दोन्ही मुली जेव्हा त्याचा छळ करतात तेव्हा तो त्यांना पिता-अपत्य-प्रेमसंबंधाची आठवण देऊ पाहतो. गॉनरिल आपल्या बापाशी, तो वेडा होईल अशा रीतीने वागली, हे जेव्हा तिच्या नवऱ्याला, ऑल्बनीला कळते तेव्हा तो तिला म्हणतो, "तुझी प्रवृत्ती मला वाटते फार भयावह : जी वृत्ती आपल्या मुळालाच टाकते झिडकारून, तिला कसलीही मर्यादा घालून स्थिर ठेवणे असते अशक्य, आपल्या खोडाच्या जीवनरसापासून जी स्वतःला टाकते चेचून आणि विच्छेदून, ती अटळपणाने जाते वाळत आणि येते जळण्याच्या कामी." (४.२.१५१) ऑल्बनीच्या बोलण्यात पिता-अपत्य-प्रेमसंबंध नैसर्गिक असल्याचे गृहित आहे. म्हणूनच, हे जर नाते तुटले तर, "अनिवार्यपणाने ही माणसेच खातील माणसांना, समुद्रामधील राक्षसासारखी". (४.२.१५२) पित्या-विरुध्द कारस्थान करणाऱ्या एडगरला उद्देशून ग्लॉस्टर "अमानुष राक्षस" हे विशेषण वापरतो तर येथे ऑल्बनीही राक्षसाचीच प्रतिमा वापरतो. तेव्हा पिता-अपत्य-प्रेमसंबंध हे मानवातील नैसर्गिक नाते आहे असे दोघांनाही सांगायचे असते.

सत्ताप्रेरणा ही एक पाशवी, कोणतेही मूल्य न मानणारी प्रेरणा आहे. तिच्या पूर्ततेमध्ये कोणताही नातेसंबंध अडथळा निर्माण करू शकत नाही. या प्रेरणेच्या दृष्टीने सत्ताधारी आणि सत्ताकांक्षी असे दोनच पक्ष असतात आणि या पक्षांत अन्य प्रकारचे कोणतेही नाते गैरलागू असते. शेक्सपियर



अनुक्रमणिका

*राजा लियर* मधून सत्तेसंबंधी ही जाणीव व्यक्त करीत आहे.

गॉनरिल-रीगन-एडमंड आपल्या बापाकडे "बाप" म्हणून पहात नाहीत. ज्याच्याकडून सत्ता हस्तगत करायची आहे असे आपले विरोधक म्हणून ते बापाकडे पाहतात. त्यांचे बाप मात्र त्यांच्याकडे आपली अपत्ये म्हणून पाहतात. त्यामुळे अपत्यांकडून त्यांच्या प्रेमाची आणि कर्तव्याची अपेक्षा करणारे बाप आणि पित्याकडे 'पिता' म्हणून पाहण्याऐवजी ज्याच्याकडून आपणांस सत्ता हस्तगत करायची आहे असे "सत्ताधारी" विरोधक म्हणून पाहणारी अपत्ये, यांच्यातील संघर्ष शेक्सपियरला चित्रित करायचा आहे. त्यामुळे येथे मूल्यांचे अंग असलेला एक व्यामिश्र स्वरूपाचा संघर्ष आकाराला येतो.

गॉनरिल जेव्हा लियरचा क्रूरपणे अवमान करते तेव्हा तो तिला विचारतो, "तू आमचीच मुलगी का?" पुढे तो म्हणतो. "...राजचिन्हामुळे, ज्ञानामुळे आणि विचारामुळे माझा चुकीचा समज व्हायचा की, मला मुली होत्या." (१.४.९५) तिलाही द्वेष करणारे पोर व्हावे आणि तिला समजून यावे की, "स्वतःचे पोर कृतघ्न असणे ही गोष्ट असते असह्य सापाच्या दाताहूनही" (१.४.९७) असे तो तिला संतापून बोलतो. रीगन अधिक "सदय आणि सुखकारक" आहे, या समजुतीने तो गॉनरिलकडून तिच्याकडे जातो. परंतु सत्तालालसेने पेटलेली रीगनही त्याचा तितकाच क्रूर अवमान करते. तो जेव्हा तिला उद्देशून — "तुझा सुकोमल स्वभाव नाही जाणार कठोरपणाच्या आहारी.... तुला आहे अधिक जाणीव, निसर्गप्रणीत कर्तव्यकर्माची, आपल्या प्रेमसंबंधाची, दाक्षिण्याच्या वर्तणुकीची, कृतज्ञतेच्या देयाची, मी तुला प्रदान केलेले अर्धे राज्य तू नाहीस विसरलेली." यावर रीगन कठोरपणे म्हणते, "अहो सरकार, मुद्याकडे वळा." (२.४.११९)

या संघर्षचित्रणात शेक्सपियरने आणखी एका गोष्टीचे सूचन केले आहे. ज्या अपत्यांशी लियरचा आणि ग्लॉस्टरचा सत्तासंघर्ष होतो त्या अपत्यांशी दोघांचेही अकृत्रिम प्रेमाचे नाते प्रस्थापित झालेलेच नाही. लियर उघडउघड गॉनरिल-रीगन आणि कॉर्डीलिआ यांच्याशी वागण्यात पंक्तिप्रपंच करतो. एडमंड उघडउघड अनौरस आहे आणि आपण त्याला उघडपणे "मुलगा" म्हणून स्वीकारले हा जणू त्याच्यावर उपकारच केला अशी ग्लॉस्टरची भावना आहे. शेक्यपियरने हा संघर्ष केवळ चांगल्या-वाईटातला, सुष्ट-दुष्टातला असा ढोबळ स्वरूपाचा बनू दिला नाही. आपल्या बापांनी आपल्यावर अकृत्रिम, उत्कट प्रेम केलेले नाही अशी त्यांच्या द्वेषाला एक बाजू शेक्सपियरने देऊन ठेवली आहे. थोडक्यात शेक्सपियरने तो अनेकांगी, व्यामिश्र बनवला आहे.

शेक्सपियरने या सत्ताप्रेरणेच्या नाट्याला शृंगारप्रेरणेच्या नाट्याची जोड दिलेली आहे. ही शृंगारप्रेरणा सत्ताप्रेरणेच्या वर्चस्वाखाली प्रकट होते. गॉनरिल आणि रीगन या दोघींनाही एडमंड पती म्हणून हवा आहे. सत्ताप्रेरणेच्या वर्चस्वाखालील या शृंगारप्रेरणेचे रूप जाणून घेण्याआधी या दोघींमधील सत्तेचा सुरू असलेला संघर्ष आणि या सत्ताप्रेरणेने दोघींच्या वैवाहिक जीवनाला दिलेला आकार समजून घेतला पाहिजे.

लियरच्या या दोन्ही मुली अतिशय सत्ताकांक्षी आहेत. लियरचा एक भाग आपल्या वाट्याला येणारच आहे, उर्वरित भाग आपल्या जाळ्यात कसे येतील याचा विचार त्यांच्या डोक्यात चालू आहे. कॉर्डीलिआचा वाटा अचानकपणे अर्धाअर्धा त्यांच्या वाट्याला येतो. आता फक्त रीगन आणि गॉनरिल या दोघींमध्येच हा सत्तासंघर्ष उरतो. शेक्यपियरने तो नाटकभर सुप्त पातळीवर राखला आहे. या संघर्षाचे चित्र त्याला रेखाटायचे नाही. परंतु संपूर्ण सत्ताप्राप्तीसाठी एडमंडच्या साथीची दोघींनाही जी गरज वाटते आणि त्यासाठी या दोघींमध्ये जो संघर्ष उभा राहतो त्याचे चित्रण शेक्सपियरला करायचे आहे. या संघर्षचित्रणाला अर्थपूर्णता मिळेल एवढेच, या दोघींमधल्या सत्तासंघर्षाचे निर्देश शेक्यपियरने केलेले आहेत.

नाट्याच्या प्रारंभी, "भावी संघर्ष आधीच लक्षात घेऊन" आपण आपले राज्य आपल्या मुलींमध्ये, आपल्या हयातीतच वाटून टाकीत आहोत, असे लियरचे बोलणे आलेले आहे. (१.१.७२) करन नावाचा एक दरबारी गृहस्थ एडमंडला विचारतो, "कॉर्नवॉलचे नरेश आणि ऑल्बनीचे नरेश यांच्यामध्ये होऊ घातलेल्या लढाईबद्दल तुम्ही काहीच ऐकले नाही?" (२.१.१०२) एके ठिकाणी केंट सद्गृहस्थाला उद्देशून म्हणतो, "ऑल्बनी आणि कॉर्नवॉल या दोघांमध्ये आहे दुफळी, जरी अजूनही तिचे तोंड आहे अच्छादित दोघांच्या मुत्सद्दीपणाखाली." (३.२.१२६) आता सुप्त असलेल्या परंतु उद्या उग्र रूपात प्रकट होणाऱ्या सत्तासंघर्षामध्ये गॉनरिल आणि रीगन या दोघींनाही एडमंडची मदत आवश्यक वाटते. तो आपला पती म्हणून लाभला तर या सत्तासंघर्षात त्याचेही हितसंबंध गुंततील आणि त्यात आपल्याला विजय मिळवणे सोपे जाईल यासाठी एडमंडच्या

प्राप्तीसाठी दोघींचाही आटोकाट प्रयत्न आहे. त्यांच्या या प्रयत्नांचे आणि त्यातून निर्माण झालेल्या दोघींमधील संघर्षाचे चित्र शेक्सपियरने रेखाटले आहे.

लियर आणि त्याच्या दोन मुली यांच्यातील सत्तासंघर्षावरून आणि त्यातून होणाऱ्या लियरच्या जीवनदृष्टीच्या विकासावरून शेक्यपियरला आपले लक्ष विचलित होऊ द्यायचे नसल्यामुळे त्याने या दोघींमधील हा सत्तासंघर्ष सुप्त ठेवला आहे. सत्ताप्रेरणेचे प्रमाथी स्वरूप प्रकट करण्यासाठी त्याने दुसरी, तितकीच प्रबळ असलेली, शृंगारप्रेरणाही सत्ताप्रेरणेच्या अधिपत्याखाली कशी नांदते, हे दर्शविले आहे.

गॉनरिल आणि रीगन आपापसातील सत्तासंघर्ष तूर्तास बाजूला ठेवून, दोघी एकत्र येऊन लियरच्या विरोधात संघर्षात उतरतात. कारण लियरने स्वतःकडे राखून ठेवलेली सत्ता काबीज केल्याशिवाय त्यांना परस्परांशी सत्तेसाठी लढताच येणार नाही. लियरकडे सत्तेचा एक भाग असताना जर त्यांच्यात संघर्ष झाला तर त्या संघर्षाला दोन ऐवजी तीन पक्ष होतील आणि अंतिम विजय मुलींपैकी कोणालाच नव्हे तर लियरला मिळण्याची अधिक शक्यता आहे; हे दोघींनीही लक्षात घेतले आहे. म्हणून समान शत्रू असणाऱ्या लियरच्या विरोधात दोघी एकत्र आल्या आहेत.

आता आपण दोघींच्या वैवाहिक जीवनाचे स्वरूप लक्षात घेऊन त्यांना एडमंडच 'पती' म्हणून का हवा आहे याचा विचार करू. या दोघींपैकी धाकटीचे लग्न कॉर्नवालच्या नरेशाबरोबर झाले आहे. कॉर्नवाल हा कसलीही मूल्ये न पाळणारा, आपल्या हेतूच्या पूर्ततेसाठी वाटेल ते करायला तयार असलेला, स्वार्थी आणि क्रूर असा नरेश आहे. स्वार्थ, क्रौर्य आणि सत्तालोभीपणा या गुणधर्मांत कॉर्नवाल आणि रीगन यांच्या कोण वरचढ आहे हे सांगणे कठीण जावे, असे हे परस्परानुरूप जोडपे आहे. एकाने दुष्टपणाची सूचना करावी आणि दुसऱ्याने त्याला अनुमती देऊन ती तात्काळ अंमलात आणावी, असा एक संवाद दोघांमध्ये आहे. केंटला खोड्यात अडकवण्याची शिक्षा देण्याची कल्पना कॉर्नवालची, "घाला खोड्यामध्ये त्याचे पाय"अशी आज्ञा रीगनची. "त्या देशद्रोही ग्लॉस्टरला हुडकून काढा" असे कॉर्नवाल म्हणताच, "त्याला एकदम फासावर चढवा" असे रीगन म्हणते. "त्याचे शुष्क हात बांधा घट्ट" अशी आज्ञा कॉर्नवाल देताच, "करकचून, करकचून". अशी पुस्ती रीगन जोडते. (३.७.१४२-४३). ग्लॉस्टरच्या एका डोळ्यावर मी लाथ हाणून तो फोडतो, असे कॉर्नवाल म्हणताच, "एक बाजू राहील वेडावीत दुसऱ्या बाजूला; दुसरा देखील!" असे म्हणून त्याचा दुसरा डोळाही कॉर्नवालला फोडायला सांगते. (३.७.१४४-४३) असे या दोघांचे एकमेकांना पूरक, अनुकूल वागणे आहे. हे दोघे खऱ्या अर्थाने एकमेकांचे सहचर आहेत. कॉर्नवालवर जेव्हा त्याचा सेवक हल्ला करतो आणि त्याला प्राणांतिक जखम करतो तेव्हा रीगनच त्या सेवकाला ठार करते (३.७.१४५) कॉर्नवाल ठार झाल्यावर रीगन एकटी पडते. कॉर्नवालचे राज्य आणि लियरकडून मिळालेले राज्य, ही दोन्ही राज्ये चालवण्याची जबाबदारी आता तिच्यावर पडते. याहीपेक्षा तिला भीतिदायक वाटते ती गॉनरिलची सत्ताकांक्षा. लियरकडून आपल्याला मिळालेले राज्य गॉनरिल आक्रमण करून बळकावील आणि आपण एकाकी असल्यामुळे तिला ते सहज शक्य होईल, ही भीती तिला पडते. अशा परिस्थितीत आपली सत्ता टिकवण्यासाठी आणि गॉनरिलचे राज्य बळकावण्यासाठी तिला कॉर्नवालच्या तोडीच्या सहचराची अत्यंत आवश्यकता आहे. असा आदर्श अनुरूप सहचर तिला, बापाशी द्रोह करून त्याची सत्ता गिळंकृत करणाऱ्या एडमंडमध्ये दिसतो आहे.

कॉर्नवाल मेल्यानंतर रीगन कोणत्या प्रकारे विचार करील याचा नेमका अंदाज गॉनरिलला आहे. कॉर्नवाल मेल्याची बातमी जेव्हा जासूद ऑल्बनी-गॉनरिलला सांगतो तेव्हा गॉनरिल "हे मला फार आवडले... ही बातमी नाही काही फारशी वाईट" (४.२.१५३) अशी समाधानाची प्रतिक्रिया देते. क्रूर, धाडसी, मूल्यांची तमा न बाळगणारा कॉर्नवाल मेल्यामुळे रीगनची शक्ती जवळपास नष्ट झाली आहे. दोघींमधील भावी सत्ता-संघर्षाच्या दृष्टीने तिला ही घटना स्वतःला अनुकूल वाटते. पण त्याच वेळी विधवा झालेल्या रीगनजवळ "आपला" एडमंड आहे, ही गोष्ट तिला चिंताजनकही वाटते. ती म्हणते, "एका दृष्टीने मला हे फार आवडले; पण आहे ती विधवा, आणि माझा ग्लॉस्टर (एडमंड) तिच्याजवळ, त्यामुळे माझ्या कल्पनेतील सर्व इमले पडायचे कोसळून या माझ्याच नाठाळ जीवनावर." (४.२.१५३) आपल्या नवऱ्याचा काटा काढू, एडमंडशी लग्न करू, रीगनशी युध्द करून सर्व सत्ता ताब्यात घेऊ. हे तिचे "कल्पनेतले इमले" आहेत आणि विधवा रीगनकडे एडमंडचे असणे तिला धोक्याचे वाटते आहे.

कॉर्नवाल-रीगन परस्परसंवादी जोडपे आहे. परंतु ऑल्बनी-गॉनरिल मात्र विसंवादी जोडपे आहे, ऑल्बनी-गॉनरिल या



अनुक्रमणिका

दोघांच्या भूमिका, मूल्ये आणि प्रेरणाव्यूह परस्परविरोधी आहेत. ऑल्बनी हा नीतिमान, मूल्यपालक नरेश आहे. लियरवर त्याची निष्ठा आहे. सत्तेचा त्याला मोह नाही. सत्तेपेक्षा नैतिक पातळीवर प्रस्थापित झालेल्या नातेसंबंधाचे त्याला अधिक मोल वाटते. गॉनरिलच्या दुष्टपणामुळे लियर वेडा झाला, याचे त्याला दुःख होते. कॉर्नवाल त्याचा साडू, परंतु त्याने ग्लॉस्टरचे डोळे फोडले हे जेव्हा त्याला कळले तेव्हा तो म्हणतो, "ग्लॉस्टर, मी जिवंत आहे. महाराजांविषयी तू दाखवलेल्या प्रेमाबद्दल आभार मानण्यासाठी, आणि तुझ्या डोळ्यांबद्दल सूड घेण्यासाठी". (४.२.१५३) लियर-हा त्याचा सासरा आहे म्हणून नव्हे, तर तो एक वंदनीय, दिलदार राजा आहे म्हणून ऑल्बनीची त्याच्यावर निष्ठा आहे. ग्लॉस्टर लियरवर प्रेम करीत असल्यामुळे त्याला ग्लॉस्टरही प्रिय आहे. ज्या एडमंडमुळे त्याचे डोळे फोडले गेले त्या एडमंडचा सूड घेण्याची भाषा ग्लॉस्टर करीत आहे. गॉनरिलचा स्वभाव त्याला आवडत नसल्यामुळे तो तिच्या कुठल्याही कृत्यात सहभागी होत नाही. तिलाही त्याच्या सल्ला-मसलतीची गरज वाटत नाही. तिच्या कारस्थानांना तो प्रतिबंध करील म्हणून ती नवऱ्याच्या अपरोक्षच सर्व गोष्टी करते. नोकर-चाकरांतही केवळ तिच्या आज्ञा ऐकणारे अनेकजण आहेत. ऑल्बनीच्या राजवाड्यातच तिची स्वतंत्र-स्वायत्त सत्ता आहे. गॉनरिल जेव्हा लियरची मानखंडना करते तेव्हा तेथे ऑल्बनी हजर नसतो. संतप्त लियर जेव्हा वाडा सोडून जाऊ लागतो तेव्हा तो तेथे येतो. आपल्या माघारी काय घडले हे आपल्याला माहीत नाही; आपण निरपराध आहोत, असे लियरला सांगतो. "आपण कशामुळे इतके संतापलात, तेही नाही मला कळलेले" असे जेव्हा तो लियरला म्हणतो तेव्हा गॉनरिल "नका घेऊ आपण त्रास त्या संबंधात अधिक जाणण्याचा" (१.४.९७) असे तुटकपणे म्हणते. नंतरही तो जेव्हा गॉनरिलच्या वागण्याबद्दल नाराजी दाखवतो तेव्हा ती, "कृपा करा, स्वस्थ बसा" असे बोलून त्याचा अपमान करते. (१.४.९८)

लियरच्या मागोमाग रीगनकडे जाऊन लियरची वादळात हकालपट्टी करून ती एडमंडच्या सोबतीने जेव्हा ऑल्बनीला परतते तेव्हा ती एडमंडच्या प्रेमात पडली आहे. एडमंडने चातुर्याने प्राप्त करून घेतलेल्या ग्लॉस्टरच्या जहागिरीमुळे तिला त्याच्यात "समानधर्मी" दिसत आहे. प्रवासात एडमंडने आणि तिने अनेक मनसुबे रचले आहेत. हे अर्थात सत्ताप्राप्तीसंबंधी असणार. एडमंडला निरोप देताना ती त्याच्या गळ्यात प्रेमाने साखळी घालते. त्यावेळी ती त्याला म्हणते, "तुमच्याचसाठी साहस करण्याची हिंमत असेल तर लौकरच आहे शक्यता तुमच्या कानावर एक मालकिणीचा हुकूम पडण्याची." (४.२.१५१) ऑल्बनीचा काटा काढून, त्याची जागा तुम्ही घ्या, असा हुकूम लवकरच मी तुम्हांला देईन, असे ती त्याला सुचवीत आहे.

गॉनरिल परतल्यावर ऑल्बनी तिचे स्वागतही करत नाही, फ्रान्सच्या आक्रमणाची बातमी कळल्यावर तो नुसते हसतो. गॉनरिल परत आल्याचे सांगितले गेल्यावर "अधिकच वाईट" अशी प्रतिक्रिया तो देतो. गॉनरिलच्या कुठल्याही योजनेत तो सहभागी होत नसल्यामुळे तिच्या दृष्टीने तो "नाकर्ता" आहे. ती त्याचा उल्लेख "भागूबाई" असा करते. तिला प्रथम लियरबद्दल आणि नंतर रीगनबद्दल जे साधायचे आहे त्यात तिला त्याचा काहीच उपयोग नाही; किंबहुना त्याचा अडथळाच आहे. या उलट तिला हवे असणारे सर्व 'गुण' एडमंडमध्ये आहेत. तो महत्त्वाकांक्षी, चतुर, क्रूर आणि मूल्यादिकांची पर्वा न करणारा आहे. तिच्या सर्व योजनांत तिला त्याचे सहकार्य मिळू शकणार आहे. त्यामुळे तिला तो हवा आहे. त्याची आणि ऑल्बनीची तुलना करून ती म्हणते, "बाप रे, पुरुषा-पुरुषामध्ये केवढा फरक! स्त्रीची सेवा तुला मिळावी हा तुझा आहे हक्कच. माझी शय्या आहे बळकावलेली एका मूर्खाने." (४.२.१५३) लियरशी क्रौर्याने वागल्याबद्दल ऑल्बनी जेव्हा तिला बोलतो तेव्हा ती त्याला "नीतिबाज महामूर्ख" म्हणते. "काय पण पौरुष! म्याव!" म्हणून त्याला हिणवते. (४.२.१५२)

"ऑल्बनीला तू खलास कर. या युध्दात तो जर विजयी होऊन आला तर मग काहीच करता येणार नाही. त्याची शय्या हीच माझी बंदिशाला बनेल." अशा आशयाचे पत्र ती एडमंडला पाठवते. आता सत्तेचे राजकारण इतके निकराला आलेले आहे की ऑल्बनीच्या जागी तात्काळ एडमंडची प्रस्थापना करणे तिच्या दृष्टीने आवश्यक होऊन बसले आहे. ऑल्बनीने नव्हे तर एडमंडने तिच्या सेनेचे नेतृत्व करून हे युध्द जिंकणे तिला फायद्याचे ठरणार आहे. परंतु विधवा रीगनने आपल्या सेनेचे आधिपत्य एडमंडकडे आधीच सोपवले आहे आणि तो पाहणी करण्यास डोव्हरकडे गेलेला आहे. येथे एडमंडच्या प्राप्तीसाठी दोघींची स्पर्धा सुरू होते. गॉनरिलचे पत्र घेऊन ऑझ्वल्ड जेव्हा ग्लॉस्टरला येतो तेव्हा एडमंड डोव्हरला गेलेला असतो. तेथे असलेली रीगन ते पत्र आमिष दाखवून मिळवू

पाहते. ते मिळणार नाही हे लक्षात येताच ती ऑज्वल्ड ला म्हणते, "तुझ्या मालकिणीपेक्षा माझ्याबरोबर करबध्द व्हायला तो (एडमंड) अधिक अनुरूप आहे." (४.६.१५८) ऑज्वल्ड डोव्हरला एडगर कडून मारला जातो. ते पत्र एडगरकडे व त्याच्याकडून ऑल्बनीकडे येते. त्यामुळे ऑल्बनीला आपल्या बायकोचे प्रेमप्रकरण आणि तिचा आपल्याला ठार करण्याचा कट कळतो.

गॉनरिलच्या पत्राने अस्वस्थ झालेली रीगन एडमंडला भेटायला तात्काळ डोव्हरला येते. एडमंडला ती विचारते, "माझ्या मेव्हण्याची वाट, त्या निषिध्द जागेकडे जाणारी, तुम्हांला कधीच नाही सापडलेली?" (५.१.१७३) गॉनरिलही एडमंडसाठी घाईघाईने डोव्हरला येते. एडमंडचा कल रीगनकडे झुकू नये असा तिचा प्रयत्न आहे. "एकवेळ ही लढाई (फ्रान्सबरोबर होणारी) मी गमावली तरी बेहेत्तर, त्या बहिणीमुळे त्याला गमावण्यापेक्षा." (५.१.१७४) असा विचार ती करते. एडमंड जर रीगनचा झाला तर तिचे बळ सहस्रपटीने वाढेल; ऑल्बनीचा आपल्याला काहीच उपयोग नसल्याने सत्तास्पर्धेत आपण एकाकी पडू; दुर्बळ ठरू; याची तिला भीती वाटते.

एडमंडने दोघींबरोबर प्रेमाची शपथ घेतली आहे. आता त्याच्या महत्त्वाकांक्षेला नवे धुमारे फुटत आहेत. कोणत्याही एका राजकन्येचा स्वीकार करून त्याला इंग्लंडचा अधिपती होता येणार आहे. कोणाचा स्वीकार करावा हा त्याच्यापुढे प्रश्न आहे. गॉनरिलने स्वतः आपल्या नवऱ्याचा काटा काढावा, मग आपण काय करायचे ते ठरवू, असा विचार तो करतो. कारण गॉनरिलने जर ऑल्बनीचा काटा काढला तर ती निराधार होईल. दोघी निराधार बहिणींपैकी एकीचा स्वीकार करून दुसऱ्या निराधार बहिणीची सत्ता जिंकून घेता येईल, असा या मागे त्याचा विचार आहे. त्याच्या भूमिकेमागे प्रेमभाव नसून केवळ सत्तालालसा आहे. गॉनरिल-रीगन-एडमंड हे तिघेही सत्तेसाठी शृंगारप्रेरणेचा वापर करीत आहेत.

फ्रान्सशी होणाऱ्या युध्दाच्या वातावरणात या दोन बहिणींमधील एडमंडप्राप्तीच्या स्पर्धेला उग्र आणि विनाशी रूप येते. युध्द जिंकल्यानंतर अहंकार वाढलेल्या एडमंडचा ऑल्बनी अपमान करतो. तेव्हा एडमंडची बाजू सांभाळण्यात दोघींची स्पर्धा लागते. गॉनरिल एडमंडला आपल्या बाजूला खेचण्यात यशस्वी होईल या भीतीने रीगन....तेथल्या तेथे सर्वांच्या समोर आपण एडमंडबरोबर विवाहबध्द होत असल्याचे जाहीर करते. आपल्या बायकोचे प्रेमप्रकरण आणि नवऱ्याला मारण्याचा कट कळालेला ऑल्बनी रीगनचा विवाहाचा इरादा अमान्य करून, आपल्या पत्नीशी एडमंड वचनबध्द असून आता हवे असल्यास तुम्ही माझे प्रियाराधन करू शकता, असे उपहासाने रीगनला ऐकवतो. गॉनरिलने रीगनला विष दिलेले असते. घाबरी झालेली रीगन तंबूत जाते आणि मरते. राजद्रोहाच्या गुन्ह्याखाली एडमंडला आणि गॉनरिलला ऑल्बनी अटक करतो. वेषांतरात असलेला एडगर द्वंद्वात एडमंडला प्राणांतिक जखमी करतो. आता गॉनरिल पूर्णतः कोंडीत सापडते. एडमंड मरणार हे तिच्या लक्षात येते. ऑल्बनीही आता आपल्याला स्वीकारणार नाही, हेही तिला समजते. ती तंबूत परतते आणि छातीत सुरा खुपसून मरण पत्करते.

आपल्यासारख्या, समाजात प्रतिष्ठा नसलेल्या माणसावर दोन राजकन्या प्रेम करतात; एवढेच नव्हे तर आपल्यासाठी मरणही पत्करतात; मिळालेल्या या महत्त्वाने एडमंड भारून जातो. मारून टाकण्याचा हुकूम दिलेल्या लियर-कॉर्डीलिआ यांना वाचवण्याचे सत्कृत्य तो करू पाहतो आणि मरतो. अशा प्रकारे मूल्यविहीन, आंधळ्या सत्ताप्रेरणेने घडवलेल्या विनाशाचे एक प्रकरण संपते. सत्ताप्रेरणेच्या अधिपत्याखाली विकृत रूप धारण केलेल्या शृंगारप्रेरणेचे शेक्सपियरने रेखाटलेले चित्र अशा प्रकारचे आहे.

*(क्रमशः)*

■■

अनुक्रमणिका

# हिंदभूच्या अर्थ-राजकीय व्यवस्थेची सम्राट अशोककृत प्राचीनकालीन आमूलाग्र पुनर्रचना आणि तिच्यावरील ब्रिटिश राजवटीचा विध्वंसक आघात

चा.अ. दाभोलकर

[श्री. चा.अ. दाभोलकर यांनी *युगपुरुष अशोक** ही कादंबरी प्राचीनकालीन सम्राट अशोकाच्या कर्तृत्वाचा व वैशिष्ट्यपूर्ण योगदानाचा परिचय पुढील पिढीस करून देण्याच्या उद्देशाने लिहिली आहे. गेल्या दोन हजार वर्षांच्या कालखंडात भारतातील वेगवेगळे भूभाग देशीविदेशी, भिन्न भिन्न वांशिक-सांस्कृतिक सत्तांच्या अधिराज्याखाली राहूनही या सर्वच भूप्रदेशाला (सारे जग) 'हिंदभू' या नावाने ओळखत आले याचे श्रेय दाभोलकर सम्राट अशोकाला देतात. (हिंदुस्तान हा शब्द दाभोलकर वापरीत नाहीत; याचे स्पष्टीकरण, मूळात 'हिंद' या शब्दाचा संबंध 'सिंधू' नदीशी आहे, धर्माशी नाही, असे दिसते.) येथील अर्थ व राज्यव्यवस्थेची उभारणी भारतीय उपखंडभर ज्या पायावर व आराखड्यानुसार अशोकाने केली त्याचे फलित म्हणून हिंदभू ही अशोकाच्या काळातच जागतिक आर्थिक महासत्ता म्हणून प्रस्थापित झाली, असा दाभोलकरांचा निवाडा आहे. अशोकाच्या राज्यविस्ताराशी तुल्यबळ असा राज्यविस्तार अशोकानंतरच्या जवळपास दीड हजाराहून जास्त वर्षांच्या काळात मुघल बादशहा औरंगजेबाचाच होता. मधल्या प्रदीर्घ कालखंडाला उद्देशून 'राजकीय बजबजपुरीचा कालखंड' असे दाभोलकरांनी म्हटले आहे. एकछत्री अंमल भारतीय उपखंडभर आहे अशी राज्यसत्ता नसतानाही 'हिंदभू' ही या सर्व काळात जागतिक आर्थिक महासत्ता राहिली हे दाभोलकरांचे महत्त्वपूर्ण निरीक्षण आहे. ते लिहितात, "हिंदभूच्या या आर्थिक सुबत्तेचे कारणही या देशातील उत्पादक व व्यापारी व्यवहारांची शासकीय हस्तक्षेपविरहित स्वायत्तता असे औरंगजेबकालीन व अव्वल इंग्रजीतील त्या संबंधीच्या कागदपत्रांवरून आढळून येते." (भूमिका, पृ. ६) ते पुढे म्हणतात, "'चाणक्याच्या *अर्थशास्त्रा*त तर सर्वच अर्थव्यवहारांत पदोपदी शासकीय हस्तक्षेपाचे आदेश आहेत. त्यामुळे हिंदभूतील सर्वदूर दिसणारी ही स्वायत्तता औरंगजेबापूर्वी या सर्वच भूप्रदेशावर कडक प्रशासकीय कार्यभार करणाऱ्या अशोकाच्याच काळात प्रदान केली, असा निष्कर्ष निघतो. म्हणजेच हिंदभूच्या प्रबळ आर्थिक सामर्थ्याची पायाभरणी अशोकाच्याच काळी झाली, असे म्हणणेच योग्य ठरते." (भूमिका, पृ. ६)

श्री. चा.अ. दाभोलकर हे कृषिशास्त्राचे पदवीधर. गोपालन व दुग्धव्यवसाय (Dairying) या विषयात पदव्युत्तर शिक्षण इंग्लंडमध्ये घेऊन परतल्यावर, दीर्घ काळ महाराष्ट्र शासनात दुग्धोत्पादन संवर्धनास वाहिलेल्या डेअरी डेव्हलपमेंट खात्यात त्यांनी कार्य केले. *महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना* हा त्यांचा १९६० च्या सुमारास प्रसिद्ध झालेला पारितोषिक प्राप्त निबंध शेतकी अर्थशास्त्राच्या विषयातला पथप्रदर्शक प्रबंध म्हणून नावाजला गेला. अलीकडे त्यांनी *दारिद्र्य निर्मूलनाचे गतिमान अर्थविज्ञान*$ हा ग्रंथ प्रकाशित केला आहे. इतिहास हा त्यांच्या आवडीचा स्वतंत्र व्यासंगाचा विषय. *युगपुरुष अशोक* या पुस्तकामधून ही गोष्ट स्पष्ट होते की त्यांचा इतिहास या विषयातल्या आस्थेचा पाया व्यापक आहे; अशोकाने सदाचार व साधारणधर्म यांचा आग्रह बाळगला, कोणत्याही एका धर्मपंथाला राज्याचा एकमेव धर्म म्हणून मान्यता दिली नाही. अशोकाने परमतसहिष्णू मानसाची मशागत केली, ही गोष्टही त्यांनी अधोरेखित केली आहे.

कौटिलीय *अर्थशास्त्रा*त अर्थ व राज्यव्यवस्थेचा जो आराखडा नमूनेदार म्हणून सांगितलेला आहे त्याचा त्याग करून वेगळ्याच वळणाच्या अर्थ व राज्यव्यवस्थेची बांधणी अशोकाच्या काळात कोणत्या तर्कशुद्ध भूमिकेमधून केली गेली तिची स्पष्टता दाभोलकरांनी 'राजसत्तेचे विघटन' या प्रकरणात केली आहे.

---

* *युगपुरुष अशोक*, प्रकाशक : चारुदत्त दाभोलकर अमृत महोत्सव समिती, ३ कोयना अपार्टमेंट्स, कांगा कॉलनी, कँप, सातारा, रू. १५०.००.

$ *दारिद्र्य निर्मूलनाचे गतिमान अर्थविज्ञान*, प्रकाशक : चारुदत्त दाभोलकर अमृत महोत्सव समिती, ३ कोयना अपार्टमेंट्स, कँम्प, सातारा; किंमत रु. ४००/-.

अनुक्रमणिका








अशोकाच्या राज्याचा कारभार प्रत्यक्षात सम्राज्ञी असंधिमित्रा व महामंत्री राधागुप्ता पहात, त्यांच्यातल्या संवादामधून राजसत्तेचे/साम्राजसत्तेचे समाजसत्तेत विलीनीकरण करण्यामागचा तर्क विशद होतो, असे चित्रण कादंबरीत येते. याला ऐतिहासिक आधार किती भक्कम ते तपासणे तूर्त बाजूला ठेवून भूमिकेमधील गाभ्याचे कोणते मुद्दे/युक्तिवाद दाभोलकर समोर ठेवतात ते पाहूया.

नोकरशाही शासनयंत्रणेचा पदोपदी व सर्व क्षेत्रांत हस्तक्षेप वाढतो तेव्हा नोकरशाहीला पोसण्याचा भार लोकांवर अतिरेकी प्रमाणात पडतो. नोकरशाहीमुळेच कल्याणकारी व विकासाची कामे मार्गी लागतात, शक्य होतात ही धारणा पक्की असते. अशोकाच्या साम्राज्याचे महामंत्री राधागुप्ता यांच्या तोंडी दाभोलकरांनी पुढील वाक्ये टाकली आहेत : "आजची कल्याणकारी विकासकामे (आपण) करीत आहोत ती शासनाकडून चालू असलेली रयतेची लूट आहे. तो एक अडथळा आहे. तो दूर करूनच हिंदभूतील सर्व हिंदवी समाजाचा शाश्वत, निरंतर सामाजिक, सांस्कृतिक व आर्थिक विकास होत राहील." (पृ. ९९)

हे सूत्र पकडून अशोकाच्या साम्राज्यातील अर्थ व राजकीय व्यवस्थेची आमूलाग्र पुनर्रचना केली गेली, असे दाभोलकरांनी सुचवले आहे. दाभोलकरांच्या मांडणीप्रमाणे अशोकाची केंद्रीय राज्यसत्ता भक्कम व शक्तिशाली होती. तिचे काम मुख्यतः साम्राज्यात शांतता व सुव्यवस्था राखण्याचे होते. ही राज्यसत्ता लोकहितदक्ष होती. तिचा आधार 'धम्मा'चे पालन हा होता. या धम्माचे पालन होत आहे हे पाहण्याचे नियमन-निमंत्रणाचे काम शासनाचे होते. ते समाधानकारकपणे होत आहे हे सम्राट अशोक जातीने पहात.

म्हणजे, चार पुरुषार्थांच्या पारंपरिक परिभाषेत सांगावयाचे तर, अर्थ व काम हे पुरुषार्थ हे स्थानिक लोकांच्या अभिक्रमाचे, कर्तृत्वाचे व समृद्धी साधण्याचे स्वायत्त व विकेंद्रित क्षेत्र होते, तर या पुरुषार्थांवर नियंत्रण ठेवणे, त्यांचे नियमन करणे, रयतेला मदतीचा हात देणे हे शक्तिशाली केंद्रीय राजसत्तेचे काम होते. कौटिलीय *अर्थशास्त्रात* वर्णिलेली एकाधिकारवादी, सर्वंकष व सर्वदूर हस्तक्षेपाधिष्ठित ही केंद्रीभूत राज्यसत्तेची संरचना-व्यवस्था अशोकाने जाणीवपूर्वक व विचारपूर्वक नाकारली, हे दाभोलकरांचे म्हणणे ऐतिहासिक तथ्याला धरून आहे असे म्हणायला हवे. सुविख्यात ज्येष्ठ इतिहासकार रोमिला थापर यांच्या *अर्ली इंडिया* या ग्रंथातही या विवेचनाला पूरक असेच प्रतिपादन आहे.

"(सम्राट अशोकाच्या मृत्यूबरोबरच) मौर्य साम्राज्यात एकच बजबजपुरी माजली.... त्याच्या धर्मखात्याचाही डोलारा कोसळला. त्यानंतर दोन हजार वर्षे काराकोरम ते कन्याकुमारीपर्यंतच्या हिंदभूवर सलग एकछत्री राज्यकारभार करणे कुणालाच शक्य झाले नाही. सर्व हिंदभू (व हिंदवी समाज) वेळोवेळी विविध राजसत्तांत, धर्मसत्तांत विभागली गेली; पण हिंदभूतील समाजाच्या स्वयंशासनात हस्तक्षेप करून हात दाखवून कुणालाच अवलक्षण पहावे लागले नाही. कारण या स्वयंशासित हिंदवी समाजात निर्मिले जाणारे, बाजारात येणारे सर्वच प्रकारचे उत्पादन इतके सुबक, इतके कमी किंमतीत या सर्वच राजसत्तांतील प्रदेशांत निर्माण होत होते की, जगभरचे व्यापारी वाट पुसत हिंदभूत येत होते." (पृ. ११४-१५)

अठराव्या-एकोणिसाव्या शतकात भारतीय उपखंडावर ब्रिटिशांची सत्ता प्रस्थापित झाली. येथे राज्य प्रस्थापित करण्यातले त्यांचे हितसंबंध त्यांच्या अर्थव्यवस्थेच्या दावणीला येथील अर्थव्यवस्था बांधून टाकण्यात गुंतलेले होते. यासाठी त्यांना येथील स्वायत्त व विकेंद्रित अर्थ व राज्यव्यवस्था उद्ध्वस्त करणे प्रथमतः आवश्यक होते. ही गोष्ट त्यांनी कशी साधली याचे काही दिग्दर्शन दाभोलकरांनी 'उपसंहार' या प्रकरणात घडविले आहे. ते संपूर्ण प्रकरण आम्ही येथे पुनर्प्रकाशित करीत आहोत.

भारतीय अर्थ व राज्यव्यवस्थेचे आकलन करून घेण्याचा हा आलोक (perspective) आजच्या प्रचलित विद्वतमान्य व वरचढ आलोकापेक्षा अगदी वेगळा आहे. महात्मा गांधींचा आलोक आणि दाभोलकरांचा आलोक यांमध्ये विलक्षण अशी एकवाक्यता आढळते. अलीकडच्या काळात श्री. धर्मपाल यांनी भारतीय समाजाच्या ब्रिटिशपूर्व काळातील अर्थ व राज्यव्यवस्थेबाबत जे लिखाण केले आहे ते पण श्री. चा.अ. दाभोलकरांच्या मांडणीची पुष्टी करणारे आहे.

**- *संपादक*]**

अशोक आणि मौर्य साम्राज्य जगाच्या विस्मृतीच्या गर्तेत गाडले गेले, अगदी हिंदभूतील हिंदवी समाजातसुद्धा. तरीही सम्राट अशोकाच्या काकनजरेखाली मौर्य सम्राट अशोकाच्या धर्मखात्याने हिंदभूतील हिंदवी समाजाच्या हाडीमांसी मुरवलेली धर्मतत्त्वे — प्रत्येकाने आपली धर्ममते स्वतःजवळच ठेवावीत; उदाहरणार्थ, दुसऱ्यांच्या धर्ममतांची निंदानालस्ती करता कामा नये; स्वतःच्या धर्ममतांचा बडेजाव करता कामा नये, परस्परांच्या धर्ममतांचा आदर करून सर्वधर्मसमभावाचे प्रत्येकाने आचरण केले पाहिजे; सर्व धर्मांतील श्रमण, ब्राह्मण, भिक्षू आदी पुरोहित वर्गाला प्रत्येकानेच आदराने वागवावे; वृद्धांना मान द्यावा, माता-पित्यांचे आज्ञापालन करावे; परमतसहिष्णुता अंगी बाळगून आचरणात आणावी; शेजारी, परिचित मित्र, नातलग इत्यादीं-बरोबर सौहार्दाची वागणूक ठेवावी; दास, नोकर, चाकर वगैरेंशी सहृदयवर्तन ठेवावे; सर्वधर्मसमभावाने सर्वांबरोबर मधुर वाणी, प्राणिमात्रांशी दयाळू, सर्वांशीच सभ्य, सुसंस्कृत नित्यांचरण असावे — हिंदवी समाजाचे नित्याचरण झाले, ती स्वभावधर्म बनली, अगदी वन्य समाजाचीसुद्धा; कारण हिंदभूतील वन्य समाजालासुद्धा जाणीव करून देण्यात आली होती की, जर या राजाज्ञेप्रमाणे वर्तणूक केली नाही तर त्यांचा सर्व समाजच नष्ट करण्याचे सामर्थ्य सम्राट अशोकात आहे.

याचा परिणाम असा झाला की, मौर्यसत्तेनंतरच्या बजबजपुरीत हिंदभूत राज्यकर्ते म्हणून आलेल्या मध्य युरोप व आशिया भागातील रानटी शक, हूण, कुशान इत्यादी टोळ्यांना त्यांच्या देवधर्म, परंपरांसह हिंदभूने अभिन्नपणे हिंदवी संस्कृतीत सामावून घेतले आहे. इतके अभिन्न की, आजच्या हिंदवी समाजात शोधूनही त्यांचा थांगपत्ता लागत नाही. मध्यंतरीच्या काळात पश्चिम आशियात एकेश्वरी ज्यू धर्माचा उदय झाला. आत्यंतिक असहिष्णू वृत्तीने त्यांच्यापैकीच येशूला पाखंडी ठरवून त्यांनी क्रूसावर खिळ्याने ठोकून ठार मारले. येशूने आपल्या शिष्यांना 'जाऽ! आणि माझ्या शिकवणीचा जगात प्रसार करा,' असा आदेश दिला. येशू ख्रिस्ताच्या दहा शिष्यांनी दहा दिशा धरल्या. त्यातला एक अशोकाच्या 'केरलपत्तनम'मध्ये, अशोकाच्या मृत्यूनंतर काही शतकांनी आला. तत्पूर्वी शे-दोनशे वर्षे आधीच मौर्य सत्तेची नामोनिशाणीही जगात उरली नव्हती. केरलपत्तनम पाटलीपुत्रपासून हिंदभूतच दुसऱ्या टोकाला, पण तेथील हिंदवी समाजाने या नवागताला त्याच्या धर्माचा प्रचार व प्रसार करायचे स्वातंत्र्य दिले. त्यावेळेपासून केरळात ख्रिस्ती समाज गुण्यागोविंदाने इतर धर्मियांबरोबरच नांदत आहे. कालगती फिरली. युरोपातील रोमन सम्राटांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला. रोमन सम्राटांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारण्याची सर्वांवर सक्ती केली. कट्टर सनातनी ज्यूंना पश्चिम आशियातुन परागंदा व्हावे लागले. त्यातील काही ज्यू कोकण किनाऱ्यावर उतरले. त्यांचा व्यवसाय तेल्यांचा, कोकण भागातील लोकांना शनिवारी तेलाचा व्यवहार वर्ज्य. या ज्यूंना शनिवारचा विधिनिषेध नव्हता; पण अपरांतकातील मौर्य प्रजेतील सर्वांच्या अंगात सम्राट अशोकाच्या धर्मखात्याने अनेक शतकांपूर्वीच परस्परांच्या धर्ममतांचा आदर करून सर्वांनी सर्वधर्मसमभावांचे पालन करावे इत्यादी धर्मतत्त्वे इतकी अंगी भिनवली होती की, या नवागतांना तेथील हिंदवी संस्कृतीने 'शनिवार तेली' म्हणून आपल्यात सामावून घेतले. युरोप-अमेरिकेत धर्मावरून ज्यूंचा अतोनात छळ होत असतानाही हिंदभूतील हा ज्यू समाज 'शनिवार तेली' म्हणून समाजात मिळून-मिसळून गुण्यागोविंदाने शतकानुशतके नांदत होता. हळूहळू ख्रिस्तीधर्म असहिष्णु व आक्रमक होत गेला. त्याने सारा युरोप, उत्तर व दक्षिण अमेरिका, सहाराच्या दक्षिणेचा आफ्रिका तलवारीच्या जोरावर ख्रिस्तमय केला. त्यांच्यातील कट्टर रोमन कॅथॉलिक पंथाचा ध्वज घेऊन पोर्तुगीज कोकण किनाऱ्यावर उतरले. राज्यकर्ते झाले. ख्रिस्तेतरांसाठी त्यांनी इन्क्विझिशन स्थापन केले. आपला मुलुख हा कॅथॉलिक मुलूख आहे असे जाहीर केले. पण दीड हजार वर्षांपूर्वी युगपुरुष अशोकाच्या धर्मखात्याने अपरांतकातील हिंदवी समाजाच्या हाडीमांसी मुरवलेली धर्ममते इतकी प्रबळ की, आपल्या पाचशे वर्षांच्या सत्तेच्या काळातही, इन्क्विझिशनचे शस्त्र वापरून सुद्धा, त्यांच्या मुलुखात ख्रिस्ती अल्पसंख्यकच राहिले. जे ख्रिस्ती झाले तेही अशोकाच्या धर्मतत्त्वांतील सर्वधर्मसमभावाचेच आचरण करत आहेत. गोवा दप्तराप्रमाणे, याचे एक महत्त्वाचे कारण या प्रजाननांची आर्थिक ताकद ही आहे. इंग्रज शहाणा. त्यांना खरे आकर्षण हिंदभूतील सुबत्तेचेच होते. सर्व हिंदभूची राजसत्ता हस्तगत केल्यावर त्यांनी हिंदुस्थान सरकारच्या राजधर्माचे स्थान चर्च ऑफ इंग्लंडप्रणीत ब्रिटिश प्रॉटेस्टंट ख्रिस्ती धर्मपंथाला दिले; पण रयतेच्या धर्मसंस्कृतीत हस्तक्षेप करावयाचे धाडस केले नाही. हिंदुस्थान सरकारचे सैन्य वापरून ब्रिटिश सत्तेखाली आणलेल्या पूर्व आफ्रिकेला मात्र त्यांनी ख्रिस्ती धर्माची दिक्षा दिली. पण अशोकाच्या धर्मखात्याने हाडीमांसी मुरवलेली सर्वधर्मसमभावाची सहिष्णुता हाच हिंदभूचा,

हिंदवी संस्कृतीचा स्थायीभाव कायम राहिला. इतका की, जाता-जाता कडव्या इस्लामिक धर्मांधांच्या हातात राजसत्ता सोपवण्यासाठी त्यांनी जेव्हा आपल्या हिंदुस्थानच्या साम्राज्यसत्तेची हिंदुस्थान व पाकिस्तान अशी फाळणी केली त्या वेळी वायव्य सरहद्द, पंजाब व बंगाल या प्रांतातील जनतेने निवडून दिलेले पंतप्रधान, अनुक्रमे, डॉ. खानसाहेब, सर फिरोज खान नून, व हसन सुऱ्हावर्दी यांचा या फाळणीला विरोधच होता.

वस्तुतः, ख्रिस्ती धर्माप्रमाणेच, इस्लाम धर्मातही सर्व परधर्मियांना आपल्या धर्मात आणणे हेच मोठे पुण्यकर्म आहे. त्यामुळेच ख्रिस्ती धर्माप्रमाणेच जिथे-जिथे इस्लामने राज्य केले तिथे-तिथे, म्हणजे मध्य आशियापासून तो सहाराच्या उत्तरेच्या आफ्रिका खंडापर्यंत सर्व जग इस्लामिक संस्कृतीने व्यापले आहे. ईस्ट इंडिया कंपनीच्या रेकार्डप्रमाणे, इराणचा सम्राट नादिरशहाने पंथाची दीक्षा दिली; पण सम्राट अशोकाने हाडीमांसी धर्मतत्त्वे मुरवलेल्या हिंदवी साम्राज्यात सार्वत्रिक इस्लामीकरण करणे कुणालाच शक्य झाले नाही. अशोकाइतक्याच पोलादी पकडीने कन्याकुमारीपासून काराकोरमपर्यंत राज्य करणारा हिंदभूतील एकमेव सम्राट म्हणजे औरंगजेब. अशोकानंतर दोन हजार वर्षांनी तो सत्ताधीश झाला. अशोकाइतक्याच कार्यक्षमतेने त्याने सर्व हिंदभूचा कारभार केला. अशोकाइतकाच कडवा धर्मनिष्ठ माणूस. परधर्मियांना स्वहस्ते इस्लामची दीक्षा देऊन पुण्यसंचय करणारा. इस्लामचा प्रसार हेच जीवितकार्य समजून कुराणाप्रमाणे राज्य करू पाहणारा सम्राट. पण हिंदभूच्या या कट्टर इस्लामिक सम्राटाने आपल्या गुरूला पत्राने खडसावले की, मी हिंदोस्तानचा बादशहा होणार ही गोष्ट माहीत असूनसुद्धा तुम्ही अरबी भाषा व कुराणाच्या अभ्यासातच माझे बालपण फुकट का घालवलेत? हिंदुस्थानात शरीयतप्रमाणे राज्य करणे शक्य नाही. येथील परिस्थितीला लागू पडेल असा *फतवा आलमगिरी* हा इस्लामिक कायद्याचा ग्रंथ इस्लामच्या धर्मार्तंडांकडून करून घेतला. त्याप्रमाणे राज्यकारभार केला. इस्लामला सक्तीचे धर्मांतर मान्य नाही, त्यामुळेच कैदेतील शाहूने नकार दिल्यावर त्याने शाहूवर धर्मांतराची सक्ती केली नाही उलट शाहू हस्तगत होताच अल्पवयीन शाहूला प्रत्येकी दोन घोडे असलेल्या सात हजार स्वारांची सरदारी व तिच्या खर्चासाठी पुणे, नगर, सोलापूर भागातील जहागिरी दिली. दरबारात शहाजादे, जवळच्या नात्यातील मंत्री, यांच्यानंतरचे सातवे स्थान दिले. तर जिहाद म्हणजे इस्लामने परधर्मियांविरुद्ध पुकारलेले युद्ध हे जाणून, ब्रह्मपुरीच्या छावणीतून मराठ्यांविरुद्ध जिहाद पुकारून स्वारीवर निघताना आपल्या सर्व हिंदू सरदारांना आपापल्या जहागिऱ्यांवर जाण्यासाठी औरंगजेबाने रजा दिली; पण औरंगजेब कऱ्हाडजवळ येईपर्यंतच कट्टर इस्लामधर्मीय औरंगजेबाच्या तितक्याच कडव्या धर्मनिष्ठ हिंदू सरदारांनी विनंती केली की, आपण जिहाद पुकारून मराठ्यांशी लढत असताना जहागिरीवर स्वस्थ बसून राहणे शक्य नाही. आम्हाला पण या जिहादात सामील होऊ देत. ही गोष्ट धर्म ही वैयक्तिक बाब आहे, तिला नित्याच्या व्यवहारात येऊ देता कामा नये, ही अशोकाची धर्माज्ञा अंगी पूर्णपणे भिनल्यामुळेच केवळ शक्य झाली. औरंगजेबाने त्या हिंदू सरदारांना आपल्या धर्मयुद्धात सामील होऊ दिले ही ऐतिहासिक वस्तुस्थिती पण, औरंगजेबासारख्या इस्लामच्या कट्टर उपासकाच्या व्यवहारातसुद्धा युगपुरुष अशोकाचा निधर्मीवाद किती प्रबळ होता हेच दर्शवत आहे.

या वस्तुस्थितीचे खरे कारण अर्थातच हिंदवी समाजाच्या आर्थिक सामर्थ्यात होते. सम्राज्ञी असंधिमित्रा व महामंत्री राधागुप्त यांनी जाणीवपूर्वक राजसत्तेचे जनसत्तेत विलीनीकरण केले. जनताजनार्दनाला स्वतःचा व स्वतःबरोबरच सर्वांचा विकास निरंतरचा साधावयाचा असेल तर पोथीनिष्ठपणा उपयोगी नाही; आपल्या विकासाच्या प्रक्रियेत जसजशा ज्या-ज्या समस्या निर्माण होत जातील तसतशा परिस्थितीनुरूप त्यांची सर्वांच्याच हिताची सोडवणूक कशी करावी, यासाठी उपजत अनुभव यांवर आधारित मार्गक्रमण करतच वाटचाल करावी लागते हे त्यांना चांगले माहीत होते. राजसत्तेच्या हस्तक्षेपाशिवाय केल्या जाणाऱ्या विकासप्रक्रियेमुळे हिंदभूच्या अर्थव्यवस्थेने इतकी गती घेतली की हा-हा म्हणता हिंदभू हीच एकमेव आर्थिक महासत्ता बनली. अशोकानंतर शतकाभरातच युरोपात ग्रीक साम्राज्याची जागा रोमन साम्राज्याने घेतली. रोमन अर्थव्यवस्थेला सर्वात मोठी गळती हिंदभूबरोबरील व्यापारामुळे लागली. कारण उच्चभ्रू रोमन धनिकांच्या चैनीच्या कापडचोपड, मसाल्याचे पदार्थ, दागदागिने, माकडे, मोर वगैरे पशुपक्षी इत्यादींच्या आयातीसाठी रोमन साम्राज्य फक्त सोनेच निर्यात करू शकत होते. हिंदभूतील बाजारपेठेत विकता येतील अशा कोणत्याही वस्तू रोमन साम्राज्यात निर्माण होत नव्हत्या. त्या काळातील रोमन व्यापाऱ्यांची हिंदभूतील वसतिस्थाने असलेल्या बंदरपट्टीतील गावांच्या उत्खननात कारोमांडल किनारपट्टीत सोन्याची रामन नाणी सापडली आहेत. त्यानंतर दोन हजार वर्षांनी पोलादी पकडीने






काराकोरम ते कन्याकुमारीपर्यंत राज्य करणारा दुसरा सम्राट औरंगजेब बादशहा याच्या परवान्याने हिंदभूत व्यापार करणाऱ्या ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीची काही कागदपत्रे प्रकाशित झालेली आहेत. त्या काळच्या व्यापारी मालात पूर्वापारच्या कापड चोपड, मसाल्याचे पदार्थांबरोबरच रंगद्रव्ये, सोरा (पोटॅशियम नायट्रेट) सारख्या रासायनिक उत्पादनांचाही समावेश होता. हा सर्व व्यापारही एकतर्फीच म्हणजे हिंदभूतून युरोप, अमेरिकेकडेच होत होता. त्या बदल्यात हिंदभूच्या बाजारात युरोप-अमेरिकेतील फ़ारसे काहीच खपत नसल्यामुळे सोने-चांदीच मोजावी लागते, अशा तक्रारी ईस्ट इंडिया कंपनीच्या लंडनस्थित डायरेक्टर बोर्डांनी वारंवार केल्याच्या नोंदी या कागदपत्रांत आढळतात. हिंदभूतून सोरा नेऊन दारूगोळा तयार करणाऱ्या युरोपियनांना तरीही त्या काळीसुद्धा आपल्या रणसाहित्याचा अभिमान होता. इतर काही नाही तर गेला बाजार युरोपियन रणसाहित्याला सदैव लढणाऱ्या हिंदभूच्या बाजारात नक्कीच मोठी मागणी मिळेल या खात्रीने समुद्रावरसुद्धा दूरवर मारा करू शकणारी एक पितळी तोफ लंडनहून मुंबईला आली. मुंबईच्या गव्हर्नरने मुंबईच्या बाजारात ती खपवायचा खूप प्रयत्न केला. पण शिवाजीशिवाय कुणीच तिला हात लावायला तयार नव्हते. शिवाजीला विकली तरी पैसे मिळणार नाहीत याची मुंबईच्या गव्हर्नरला खात्री होती. कारण इंग्लंडमधील प्रसिद्ध 'पिट' घराण्याचा संस्थापक थॉमस पिट त्याच्या आधी मुंबईचा गव्हर्नर होता. त्याने शिवाजीच्या मुलखात खरेदी केलेल्या मालाचे पैसेच दिले नव्हते. शिवाजीने त्या पैशांबाबत मुंबईच्या गव्हर्नरला जबाबदार धरले होते. शेवटी मुंबईच्या गव्हर्नरने लंडनहून मोठ्या अपूर्वाईची म्हणून पाठवलेली पितळी तोफ सुरतेच्या तोफांच्या बाजारात विक्रीसाठी ठेवली. शेवटचा निजामशहा मूर्तिजा याने परांडा येथील निजामशाही तोफांच्या कारखान्यात गाळून घेतलेली मुलुखमैदान तोफ आजही विजापूरच्या बुरजावर आहे. ती पाहिली की, हिंदभूच्या बाजारात या पितळी तोफेला कुणीच का विचारत नव्हते ते सहज लक्षात येईल; पण बेपारी इंग्रजांच्या मात्र ते लक्षात आले नाही. त्यामुळे लवकरच जेव्हा औरंगजेब बादशहा स्वतः मराठ्यांचे डोंगरी किल्ले जिंकायला निघाला त्यावेळी इंग्लंडचा राजा दुसरा विल्यम याने तोफांचा नजराणा देऊन आपला वकील त्याच्या दरबारी पाठवला. औरंगजेबाने त्यावेळी पन्हाळ्याला वेढा घातला होता. त्या वेढ्यात हे इंग्लंडच्या राजाचे वकील जाऊन पोचले. तोपर्यंत पन्हाळा औरंगजेबाने हस्तगत केला होता. त्या विजयाबद्दल रिवाजाप्रमाणे प्रत्येक सरदाराने आपापला नजराणा बादशहाला दिला. इंग्लंडच्या राजाच्या वकिलाने ही संधी साधून बादशहाला मेड इन इंग्लंड बंदुका नजर केल्या. औरंगजेबाला शस्त्र-सामुग्रीची पारख चांगली. त्या बंदुका त्याने हातात घेतल्या, बघितल्या व जवळच्या उमरावाला 'तुझ्या पोरांना खेळणं म्हणून दे' म्हणून देऊन टाकल्या. पन्हाळ्यानंतर औरंगजेबाने शिवाजीने 'खेळणा' नाव दिलेल्या विशाळगडाला वेढा दिला. त्या वेढ्यात त्याने इंग्लंडच्या बादशहाने नजराणा म्हणून खास इंग्लंडहून पाठवलेल्या तोफांचा वापर केला. खेळण्याच्या तटबंदीने त्यांची 'खेळण्यातल्या तोफा' अशीच संभावना केली. त्याच वेढ्यात औरंगजेबाने त्याच्या तोफखान्यात चाकरीवर असलेल्या पोर्तुगीज गोलंदाजांना मराठ्यांची गोलंदाजी प्रभावी ठरते, तुमची मात्र निष्प्रभ ठरत आहे, याचा जाब विचारला. पोर्तुगीज गोलंदाजांनी उत्तर दिले, "मराठ्यांचा दारूगोळा शाही दारूगोळ्यापेक्षा फार वरच्या दर्जाचा आहे." सातारा किल्ल्याच्या वेढ्यातही शाही तोफखान्याच्या मोगल गोलंदाजानी औरंगजेब बादशहाला असेच उत्तर दिले होते. पेशव्यांच्या वसई मोहिमेच्या सुमारास कमी मनुष्यबळात अविरत तोफगोळ्यांचा मारा करण्याची क्षमता असलेल्या तोफांची गरज होती. नुकताच अशा तोफांचा वापर युरोपात होऊ लागला होता. वसई किल्ल्याच्या संरक्षणासाठी अशा काही तोफा पोर्तुगालहून रवाना झाल्या. त्या तोफा गोव्यापर्यंत येणेपूर्वीच वसईचा पाडाव झाला. या तोफांची माहिती मराठ्यांचा नौदलप्रमुख तुळाजी आंग्रे याच्या कानावर गेली. वेळ न दवडता विजयदुर्गमधील तोफा ओतायच्या कारखान्यात तुळाजी आंग्रे यांनी तशा तोफ ओतून घेतल्या.

इराणचे नौदल उभारण्यासाठी नादिरशहाने लढाऊ जहाजे बांधण्याचे काम सुरतेतील व्यापारी गोद्यांना दिल्याची नोंद इंग्रजांच्या कागदपत्रांत आहे. त्याकाळी ईस्ट इंडिया कंपनीसुद्धा आपल्या नौका हिंदभूत बांधून घेई, असेही उल्लेख सापडतात. तोकाळपर्यंत तरी सर्वच क्षेत्रात हिंदभूच आघाडीवर होती, असे पुरावे सापडतात. दिल्लीच्या लाल किल्ल्यात पाणी खेळवण्यासाठी शहाजहान बादशहाने सरहिंदजवळ धरण बांधून तेथून कालवा खणला होता. शहाजहानचा नातू शहाअलम बादशहा शिखांवर चाल करून जाताना या कालव्यात मासे पकडत होता. इतका तो कालवा मोठा होता. विजयनगरच्या राजाने बांधलेल्या मंदिरातील एका खांबातून संगीताचे सूर

काढता येतात. खानदेशातील एका देवळात जवळजवळ असणाऱ्या दोन मनोऱ्यांपैकी एकावर चढून हातापायाच्या रेट्याने दुसरा मनोरा हलवता येतो. इब्राहिम आदिलशहाने विजापुरात बांधून घेतलेल्या जगविख्यात गोलघुमटातील एका बाजूच्या बाकावर बसून भिंतीकडे तोंड करून नुसती कुजबूज केली तरी इतर कोणालाही ऐकू न येता त्याच घुमटाखालील समोरच्या दूरवरच्या बाकावर बसून भिंतीला कान लावून बसलेल्या माणसाला मात्र ती स्पष्ट ऐकू येते. दिल्लीच्या बाजारात हिमालयातील बर्फ विकला जाई, तर काश्मीरच्या कागदउद्योगाची नोंदही आढळते. डाक्याची मलमल तर जगप्रसिद्धच आहे.

सतत दोन हजार वर्षांपेक्षाही जागतिक आर्थिक महासत्ता असलेल्या या हिंदभूवर कारभार करण्याकरता व्यापारी इंग्रजांनी व्यापारी कावा केला. उत्तर पेशवाईत उदयास आलेल्या पटवर्धन दप्तराचे संशोधक वासुदेवशास्त्री खरे यांनी लिहून ठेवले आहे की, ओतान्याकडून तोफा ओतून घेण्याच्या खर्चापेक्षा इंग्रजांच्या तोफा कमी किंमतीत मिळत, त्याच खरेदी केल्या जाऊ लागल्या. यावर *मराठे आणि इंग्रज* या ग्रंथात न.चिं. केळकर म्हणतात, "इंग्रजांकडून खरेदी केलेल्या तोफांनी इंग्रजांबरोबर लढताना इंग्रजांची सरशी होणारच. आपल्या जवळच्या भारी तोफा इंग्रज मराठ्यांना का विकेल?, तर काय" मराठ्यांना तोटा खाऊन शस्त्रसामुग्री विकून इंग्रजांनी फारच स्वस्तात हिंदभूचा कब्जा केला. अशोकापासून औरंगजेबापर्यंत दोन हजार वर्षे परस्परांशी लढणाऱ्या असंख्य राजसत्तांत विभागलेल्या हिंदभूतील हिंदवी अर्थव्यवस्था तरीही सतत विकासच पावत राहिली. जागतिक आर्थिक महासत्ता हे तिचे स्थान कायमच होते. इतकेच नव्हे तर औरंगजेबानंतरच्या इंग्रजी सत्तेपर्यंतच्या शतक दीड शतकांच्या राजकीय बजबजपुरीचाही हिंदवी अर्थव्यवस्थेच्या विकासावर व जागतिक अग्रस्थानावर कोणताच परिणाम झाला नव्हता. हे इंग्रजांना परवडणारे नव्हते, असे त्या काळच्या ब्रिटिश पार्लमेंटमधील चर्चेवरून स्पष्ट होते. इंग्रजांना हिंदभूतील संपत्ती हवी होती. त्यासाठीच सत्तेचे ओझे त्यांनी उचलले होते. हिंदभूच्या संपत्तीचा ओघ इंग्लंडकडे वळवला की, सत्तेचे घोंगडे एतद्देशीय 'काळ्या इंग्रजां'च्या गळ्यात बांधून त्यांना मायदेशात परत जावयाचे होते. त्यासाठी त्यांनी हिंदभूच्या सुबत्तेचा व्यापारी शोध घेण्यास सुरवात केली.

त्यासाठी हिंदुस्थान सरकारात प्रशासकीय सेवेबरोबरच विविध विद्याशाखेच्या – शेतकी सेवा, जंगल सेवा, पशुवैद्यक सेवा, बांधकाम व दळणवळण सेवा इत्यादी – स्वतंत्र सेवांची निर्मिती केली. त्या-त्या सेवात हिंदुस्थान सरकारच्या पगाराने त्या-त्या क्षेत्रातील विलायती तज्ज्ञांची भरती केली. त्या काळी उत्तर कारवारपासून सिंधपर्यंतच्या भूप्रदेशात मुंबई इलाखा होता. या इलाख्याच्या शेतकी खात्यावर सर्वप्रथम डॉ. मॅन या हिंदुस्थानच्या शेतकी सेवेतील तज्ज्ञांची नेमणूक केली. सिंधसकट कारवार अखेरच्या या प्रचंड भूभागाची प्रत्यक्ष भेटी देऊन पाहणी केल्यावर या मॅनसाहेबांनी लिहून ठेवले आहे की, आज हजारो दशके कसवटीखाली असलेल्या भूप्रदेशातील शेतजमीन आपला कस टिकवून आहे ही अचंब्याची गोष्ट आहे! नंतर आलेल्या अशाच दुसऱ्या इंग्रज शेतकी तज्ज्ञाला, दख्खनच्या कमी पावसाच्या प्रदेशातील उन्हाळ्यात नित्य खोलवर भेगाळणाऱ्या जमिनीत शेतकरी फक्त पेरायला व कापणीला जातो आणि भरघोस पीक घेतो, याचा अचंबा वाटला. ("Black cotton ploughs and irrigates itself".)

अचंबा वाटून तोंडात बोट घालून बसायला हिंदुस्थान सरकारने हे इंग्रजी तज्ज्ञ सेवेत घेतले नव्हते. लवकरच या मागील शास्त्रीय वस्तुस्थिती त्यांनी शोधून काढली. तिचा व्यवस्थित वापर करून हिंदभूतील शेतकी उत्पादकतेचे पूर्ण वाटोळे करण्यास त्यांनी सुरवात केली. जमिनीचा कस जमिनीतील सेंद्रिय पदार्थामुळे टिकून राहतो. हिंदभूतील शेतीव्यवस्थेला तो पुरवठा तलाव व जलप्रवाहांतील गाळ, जंगलपट्टीतील पानगळ, घरच्या जनावरांचे शेण यातून गेली हजारो वर्षे नित्य, मुबलक प्रमाणात व मोफत चालू आहे त्यातून होतो. सेंद्रिय पदार्थांत पावसाचे पाणी धरून ठेवण्याची शक्ती असते. वनस्पतीपासूनच निर्माण झालेले असल्याने या सेंद्रीय पदार्थांत वनस्पतींना आवश्यक ती जीवनद्रव्ये विद्राव्य स्वरूपात असतात. त्यामुळे पावसाचा ताण पिकांना जाणवत नाही. इंग्रजांचे राज्य म्हणजे कायद्याचे राज्य. कायद्यापुढे सगळे सारखे व बांधील, हतबल. पाचामुखी परमेश्वर व सामोपचार त्यांना मान्य नव्हता. साहजिकच पूर्वापारची, कसेल त्याची जमीन व उरलेली जमीन गावकीची ही व्यवस्था इंग्रजी कायद्याला मान्य नव्हते. इंग्रजी कायद्याप्रमाणे देशातली सर्व जमीन सरकारची. त्या जमिनीसाठी शासन ठरवेल तो शेतसारा शासनाला देऊनच, सारा भरेल तोवरच, त्या जमिनीच्या कसवटीचा अधिकार कसणाऱ्याला प्राप्त होणार. उरलेली सर्व जमीन सरकारच्या मालकीची. साहजिकच त्या जमिनीतील जल, तरू, पाषाण सर्व काही शासकीय मालकीच्या








गोष्टी. परमदयाळू इंग्रज सरकारच्या खजिन्यात रोख रोकड भरून, लेखी परवाना घेऊन कुणाही रयतेला झाडे, फांद्या, पाने, गळाठा इत्यादी शासकीय जंगलातील माल, ओढे, नद्या, तलाव इत्यादीतील पाणी, गाळ, पोयट्याची माती, इत्यादी सर्व काही शासकीय यंत्रणेला ठिकठिकाणी दक्षिणा देत हवा तेवढा नेण्याची परवानगी दिली. आता, स्वतःच्या खर्चाने, एवढे सव्यापसव्य करून खतासाठी पोयटा, गाळ, गळाठा इत्यादी सेंद्रिय पदार्थ शेतीत आणून घालणे कुणाला परवडणार? गावजंगलातून लाकूड फाटा मिळणे बंद झाल्याने घरोघरच्या जनावरांच्या शेण्यासुद्धा गोवऱ्या थापून चुलीत इंधन म्हणून वापरल्या जाऊ लागल्या. याचा एकत्रित परिणाम शेतकी उत्पादने घटण्यात झाला. त्याकाळच्या एका निरीक्षणाप्रमाणे कोकणातील डोंगरपट्टीतील झाडे राब भाजण्यासाठी जाळणे बंद झाल्याचा परिणाम म्हणून कोकणातील विहिरींचे पाणी उन्हाळ्यात आटले. ते सर्व पाणी डोंगरपट्टीतून पूर्वापारप्रमाणे खालच्या विहिरीत न येता, त्या झाडांच्या पानातूनच बाष्पीभवनामागे हवेत जाऊ लागले. चांगल्या राबाअभावी भाताचे उत्पन्न घटले. घाटावरही तोच प्रकार. गावतळी, बंधारे इत्यादी सर्व काही गाळाने होरत गेली. गावोगाव पाणीटंचाई उन्हाळ्यात जाणवू लागली. सेंद्रिय खताच्या अभावामुळे पिकाचे उत्पादन घटू लागले. परमदयाळू इंग्रजांनी मायदेशातून रासायनिक खत तयार करून खेडोपाडी आपल्या एजंटमार्फत विकण्याची व्यवस्था केली. शेतकऱ्यांचा रोख खर्च वाढला, जमिनी निकस व खारपड होऊ लागल्या. हे सर्व अर्थातच इंग्रजांच्या राज्यात. संस्थानी मुलखात पूर्वापारप्रमाणे राजस्थानात 'जोहाड', लडाखात कुंड या गावतळ्यांच्याच विविध प्रकारांच्या माध्यमातून पूर्वापारसारखाच पावसाच्या पाण्याचा साठा व त्यातील गाळाचा शेतजमिनीला पुरवठा चालूच राहिला. परिणामी दुसऱ्या महायुद्धाच्या सुरवातीपर्यंत हिंदुस्थानातून गहू, भुईमूग, कापूस इत्यादी शेतमालाची युरोपला निर्यात चालूच राहिली. वाढत्या लोकसंख्येचे पालनपोषणही याच शेतीतून होत होते.

या शेतमालाबरोबरच इतरही वनस्पतीजन्य मालाची निर्यात चालूच होती. पहिल्या महायुद्धापर्यंत नैसर्गिक रंगद्रव्यांची निर्मिती व निर्यात यांमध्ये जागतिक बाजारपेठेत हिंदुस्तानचा एकाधिकार होता. याचा शोध घेता-घेता साहेबबहादूरांनी विसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर त्यांच्या हिंदुस्थानच्या साम्राज्यातील विविध वनस्पतींची, शास्त्रीय नावाप्रमाणेच स्थानिक भाषांतील नावे, उपलब्धतेची हिंदुस्थानातील ठिकाणे, त्या वनस्पतींचे संपूर्ण तपशीलवार वर्णन, त्या-त्या वनस्पतींचा परिसरात केला जात असलेला उपयोग, त्या उपयोगाबाबत, मुख्यतः वैद्यकीय वापराबाबत लष्करी व मुलकी ब्रिटिश वैद्यकीय सेवेतील डॉक्टरांना आलेला अनुभव इत्यादी सर्व माहितीने परिपूर्ण असे, हिंदुस्थानच्या साम्राज्यातील झाडून साऱ्या वनस्पतींची माहिती देणारे वनस्पतीच्या शास्त्रीय नावांच्या आद्यांक्षरानुसार अठरा खंड 'डिक्शनरी ऑफ इकॉनॉमिक प्रॉडक्टस् ऑफ इंडिया' या नावाने प्रकाशित केले.

वस्तुतः, युरोप-अमेरिकेपेक्षा अनेक शतके आधीपासून विकसित होत असलेली हिंदभूतील जैविक विविधता अनेक पटींनी जास्त आहे. कारण शतकानुशतके चालत आलेला हिंदवी अर्थव्यवस्थेचा हा विकास अर्थव्यवस्थेच्या गरजेनुसार विनाअडथळा सतत होत असल्याने निसर्गतःच पर्यावरणाचा योग्य तो समतोल साधूनच होत आलेला आहे. उदा., युरोप-अमेरिकेतूनच नव्हे, हिंदभू सोडून बाकी आशिया खंडातूनसुद्धा नष्ट झालेला सिंह हा वनराज आजही हिंदभूत वन्यप्राणी म्हणून अस्तित्वात आहे. गीरच्या जंगलातील पशुपाल भरवाडांची साथसंगत गेली हजारो वर्षे पर्यावरणाचा ऱ्हास न होता अस्तित्व राखून आहे. याच कालखंडात या भरवाडांनी विकसित केलेल्या जाफराबादी म्हशींचे कळप स्वतःचे व आपल्या मालकांचे या वन्य सिंहांपासून संरक्षण करत विकसित झाले आहेत. इंग्रजी अंमलातच गिरनारच्या जंगलातच, कुठल्याही शासकीय मदती शिवाय, कुठल्याच नवशास्त्रीय इंग्रजी प्रशिक्षणाशिवाय या भरवाडांनी विकसित केलेल्या या जाफराबादी म्हशी हे जगात सर्वात जास्त अन्नांश असलेले व सर्वात जास्त दूध देणारे जनावर होते; पण 'काळ्या इंग्रजां'च्या हातात सत्ता सोपवून गोरा इंग्रज मायदेशी गेला.

या 'काळ्या इंग्रजा'चे हिंदभूचे ज्ञान 'अटको पासुन विटको' पर्यंत; त्याची सर्व भिस्त इंग्रजी पोथ्यापुस्तकांवर. या पोथ्यापुस्तकांप्रमाणे भारताचा विकास करण्याची व इंग्रजबहादूरांची शाबासकी मिळवायची त्यांना लई घाई. सर्व संस्थाने भारत सरकारात विलीन झाली. तत्काळ या 'काळ्या इंग्रजां'नी राजस्थानमधील संस्थानांतील जोहाड व लडाखमधील 'कुंड' या जुन्यापुराण्या पाणीपुरवठ्याच्या योजना विकासाच्या नावे बंद पाडल्या, तसेच जुनागड संस्थानातील गीरच्या जंगलातील या भरवाडांना त्यांच्या शतकानुशतकांच्या पिढिजात वस्तीस्थानातून विस्थापित केले. सर्व गीर जंगलच वन्य सिंहांचे अभयारण्य

म्हणून घोषित करून, पूर्वापार त्यांच्या संगतीत राहणाऱ्या भरवाडांचे व त्यांच्या म्हशीच्या कळपांचे नैसर्गिक संरक्षण काढून घेऊन चोरट्या शिकाऱ्यांचा मार्ग मोकळा केला. भरवाडांनी अनेक पिढ्यांच्या परिश्रमाने विकसित केलेल्या जगातील सर्वात जास्त अन्नांश व सर्वात जास्त दूध देणाऱ्या जाफराबादी म्हशीच्या सर्वच कळपांची अन्नान्नदशा केली. त्यांचे कोणतेच सोयरसुतक या 'काळ्या इंग्रजां'ना असण्याचे कारणच काय? त्यांच्या पोथ्या-पुस्तकांप्रमाणे जगातील सर्वात जास्त दुभती जनावरे भारतात आहेत; पण जनावरामागे दूध मात्र कमी मिळते. उलट युरोप-अमेरिकेत दुभत्या जनावरामागे दूध जास्त मिळते. त्यामुळे कमी जनावरांत तेथे जास्त दूध मिळते. त्यांच्या या इंग्रजी पोथ्या-पुस्तकांत न आलेली पण मी स्वतः इंग्लंडमध्ये जाऊन समक्ष पाहून लक्षात घेतलेल्या या आकडेवारीतील ग्यानबाची मेख अशी आहे की, सर्वच दुभती जनावरे तिसऱ्या वेतानंतर कमी-कमी प्रमाणात दूध देऊ लागतात. त्यामुळे इंग्लंड-अमेरिकेतील दुधाच्या धंद्यात तीनशे दिवसांच्या वेतात हजार गॅलनपेक्षा जास्त दूध देणाऱ्या गाई सोडून बाकी सर्व गाई कसायांना विकतात. साहजिकच त्या देशातील एकूण दुभत्या जनावरांच्या संख्येने एकूण दुधाला भागले की, दुभत्या जनावरामागे दूध जास्त दिसते. भारतात मात्र जनावर मरेपर्यंत पोसले जाते. त्या जनावरांच्या पहिल्या तीन वेतांतील दूध युरोप-अमेरिकेपेक्षा जास्त असले तरी, त्यांच्या एकूण सर्व वेतांतील दुधातील सरासरी निसर्गतःच कमी असणार. युरोप-अमेरिकेतही पहिल्या तीन वेतांत वर्षाला हजार गॅलन दूध देते म्हणून कसायाकडे न पाठवता मरेपर्यंत सांभाळलेल्या गाईच्या दुधाची सरासरीही अशीच नैसर्गिक कारणांनी कमीच पडते. युरोप-अमेरिकेतील पहिल्या तीनच वेतांतील दुधाप्रमाणेच जर भारतातील जनावरांच्या फक्त पहिल्या तीनच वेतांतील दुधाचाच विचार केला तर आजही भारतीय जनावरे पहिल्या तीन वेतांत युरोपियन जनावरांपेक्षा जास्त दूध देतात, हे कुणालाही तपासून पाहता येईल. गोरे इंग्रज सत्ता सोपवून गेलेल्या 'काळ्या इंग्रजां'नी मात्र, आपल्याला शिकवलेल्या इंग्रजी पोथ्या-पुस्तकांना गृहीत धरून, भारतातील दुभत्या जनावरांचे दुग्धोत्पादन सुधारण्यासाठी युरोप-अमेरिकेतील फ्रिजनसारख्या दीड टक्के फॅट असलेल्या व भरपूर दूध देणाऱ्या जातीच्या जनावरांबरोबर संकर करून भारतातील गाईची वंशशुद्धता नष्ट करून पहिल्या काही वेतांत भरपूर पण पाणीदार दूध देणारी संकरित गाईंची जात निर्माण केली. तरीही भारताच्या बाजारात मागणी आहे ती म्हशीच्या दुधाची. कारण म्हशीच्या दुधापासून लोणी व खवा गाईच्या दुधापेक्षा जास्त मिळतो. दुभती म्हैस ही भारतीय पशुपालन व्यवसायाने जागतिक दुग्धोत्पादन व्यवसायाला दिलेली देणगी आहे. पण तिच्या संरक्षणाची या 'काळ्या इंग्रजां'ना जाणीवच नाही. जगातील सर्वात जास्त दूध व दूधातील लोणी, खवा वगैरे अन्नपदार्थ निर्माण करणाऱ्या जाफराबादी म्हशीच्या कळपांना व ते कळप विकसित केलेल्या भरवाडांना, त्यांच्या पिढीजात जंगलातून हुसकावून लावून ते जंगल सिंहांचे अभयारण्य म्हणून विकसित करणे यालाच ते भारताचा विकास म्हणतात. स्वातंत्र्योत्तर भारतात झालेली सर्वच विकासकामे अशीच विकासाच्या नावाने अर्थव्यवस्था भकास करणारीच होत आलेली आहेत, हे कुणालाही तपासून पाहता येते; पण कुणीच तपासून पाहत नाही. कारण इंग्रजी सत्तेने भारतीय अर्थव्यवस्थेप्रमाणेच भारतीय संस्कृतीच्या सर्वच विकसनशील अंगांना विनाशाच्या वाटेवर वळवून ठेवले आहे.

आज सर्वत्र चर्चिल्या जाणाऱ्या मनुवादाचेच उदाहरण घेऊ. चाणक्याने आपल्या ग्रंथात ज्या पूर्वसुरींच्या विचारांचा परामर्श घेतला आहे, त्यात मनूचा उल्लेख नाही. याचाच अर्थ मौर्यकाली चाणक्याच्या मार्गदर्शनाखाली चालू असलेल्या राजकारभारात मनुस्मृतीला कोणतेही स्थान नव्हते. मनुस्मृती ही हिंदसमाजाच्या माथी मारली ती इंग्रजांनी. ब्रिटिशपूर्वकालीन अनेक न्यायनिवाडे प्रकाशित झालेले आहेत. उदाहरणार्थ, आपण पूर्व पेशवाईतील तीन निवाडे पाहू. औरंगजेबाच्या स्वारीच्याच वेळी शृंगेरी मठाचे शंकराचार्य महाराष्ट्रात हिंडत होते. त्यांनी त्यांच्या मठातील पोथीपुस्तकांप्रमाणे प्रभू हे क्षत्रिय आहेत, त्यांना मुंजीचा अधिकार आहे, असे सांगणारे आज्ञापत्र दिले. पुढे बाळाजी बाजीराव पेशव्यांनी पुण्यातील ब्रह्मवृंदांच्या सांगीने त्याला आक्षेप घेतला. या वादाचा निर्णय लावणेसाठी मनुस्मृतीचा उपयोग झाला नाही. त्यासाठी नानासाहेब पेशव्यांनी अखंड हिंदुस्थानातील सर्व धर्मक्षेत्रांतील धर्मज्ञ ब्राह्मण व चारी पीठांचे शंकराचार्य यांना पालख्या पाठवून पोथ्यापुस्तकांसह सातारला आणले. त्यांची त्याकाळच्या कागदपत्रांत नोंदलेली संख्या दहा हजार आहे. हे सर्व दहा हजार धर्मज्ञ ब्राह्मण, आपापल्या तीर्थक्षेत्रातील सर्व धार्मिक निवाडे — जे आज मनुस्मृती प्रमाण मानूनच केले जातात — जे आपापल्या धर्मग्रंथाबरहुकूम करीत होते. त्या प्रत्येकाच्या धर्मग्रंथाप्रमाणे या एकाच प्रश्नाबाबत





अनुक्रमणिका

दिलेला निवाडा भिन्न होता. मनुस्मृतीचा पुसटसुद्धा उल्लेख त्या निवाडापत्रात नाही.

'नस्त्रिस्वातंत्र्यम् अर्हती' हे मनूवचन सर्वश्रुतच आहे. थोरले बाजीराव पेशवे यांच्या काळातील पुढील दोन निवाडा-पत्रांमध्ये मनुस्मृतीच्या या वचनाची ऐशीतेशी केलेली दिसते. एक निवाडा आहे कोकणपट्टीतील. राजापूर येथील एक ब्राह्मण स्त्री माहेरी जाताना तिच्यावर मार्गात बलात्कार झाला. आजच्या मनुस्मृतीप्रमाण काळात ती स्त्री जीवनातूनच उठेल. त्यामुळे या गोष्टीची वाच्यताच करण्यास ती धजावणार नाही. त्या काळात मात्र घरी येताच त्या स्त्रीने ही हकिकत घरच्या लोकांना सांगितली. त्याबद्दल शासनदरबारी तक्रार केली. बलात्काऱ्याला देहदंड शासनाने दिला. बलात्कारित गृहिणीचा यात काहीच दोष नसल्याने तिचा संसार पुढे चालू झाला. त्या कुटुंबाला परत धर्मतः शुद्ध करावे म्हणून तेथील सुभेदारांनी कऱ्हाडकर ब्राह्मणवृंदांना विनंती केली. आताच आपण पाहिल्याप्रमाणे, त्या काळी जितकी धर्मक्षेत्रे तितके ब्रह्मवृंद व जितके ब्रह्मवृंद तितके धर्मग्रंथ अशी स्थिती असल्याने, प्रभूंना मुंजीचा अधिकार आहे का नाही, या साध्या प्रश्नाला अखंड हिंदुस्थानातील सर्व धर्मक्षेत्रांतील मिळून दहा हजार धर्मज्ञ ब्रह्मवृंदांच्या धर्मग्रंथांतून दहा हजार उत्तरे दिली गेल्याचा तो काळ. बलात्कारित स्त्रीबद्दल निर्णय देणाऱ्या मनुस्मृतीशिवाय इतरही दोन-चार पोथ्या आजही उपलब्ध आहेत. 'प्रायश्चित्तेन शुद्धयती' तत्त्वाप्रमाणे बलात्काराचा दोष घालवणारा प्रायश्चितविधी सांगणारा धर्मग्रंथ त्या काळी कऱ्हाडकर ब्रह्मवृंद वापरत असावेत. आज उपलब्ध असलेल्या एका स्मृतिग्रंथाप्रमाणे तर रजोदर्शनाने बलात्कारित स्त्री आपोआप शुद्ध होते.

दुसऱ्या उदाहरणात करवीरच्या एका ब्राह्मणाची बायको माहेरी गेली, त्या वेळी माहेरच्या लोकांसमवेत तिने शाक्त धर्म स्वीकारला. शाक्त धर्म म्हणजे 'योनिपूजक'. आजच्या मनुस्मृतीच्या काळात धर्मपत्नीला टाकून दुसरीबरोबर संसार थाटणे सहजसाध्य. पण त्या काळी पहिल्या धर्मपत्नीला धर्मतः घटस्फोट दिल्याशिवाय दुसरी धर्मपत्नी करणे धर्मबाह्य. त्यामुळे तो ब्राह्मण संकेश्वर पीठाच्या शंकराचार्यांच्या दरबारी आपली समस्या घेऊन गेला. शंकराचार्यांनी सर्व घडामोडी लक्षात घेऊन त्या ब्राह्मणाला घटस्फोट देऊन दुसरी धर्मपत्नी करणेस परवानगी दिली.

मलिकंबराच्या काळातील या संदर्भातील एक प्रकरण धार्मिक उदारपणाचे व सामाजिक सहिष्णुतेचे आगळेच दर्शन घडवते. नाशिकच्या धर्माधिकारी घराण्यातील तीन बंधूंतील एक मरण पावतो. मागे त्याची विधवा कन्या. मनुस्मृतीप्रमाणे विधवा स्त्री वडिलांच्या मिळकतीमध्ये हयातीपुरती अन्न-वस्त्राची अधिकारी. या निवाडापत्राप्रमाणे मात्र त्या विधवेला व तिच्या मुलीला मृतबंधूच्या घरदारासह त्याच्या धर्माधिकारी वृत्तीचाही तिसरा हिस्सा दिला जातो. वृत्तीची धर्मकृत्ये करण्याकरता हे कुटुंब गावातीलच एका ब्राह्मणाला आश्रय देतात. ती मुलगी वयात येते. निसर्ग आपले काम बजावतो. त्या मुलीकडून 'बदकर्म' घडते. ग्रामण्य भरते. मायलेकींना गाव सोडून जावे लागते; पण त्यांना मिळालेली मालमत्ता व वृत्ती रोखीने विकून त्या मायलेकी काशिवासास जातात. अशोकाच्या धर्मखात्याने हिंदभूतील सर्व समाजाच्या हाडीमांसी अंगात मुरवलेल्या धार्मिक बाबतीतील सामाजिक उदारता व सहिष्णुता, त्या काळात धर्मांतर करून इस्लाम धर्म स्वीकारलेल्या रयतेतही, निदान महाराष्ट्रात तरी, कशी होती याची माहिती हैद्राबादच्या दप्तर-खात्याने प्रकाशित केलेल्या औरंगजेबकालीन मराठवाड्यातील काझीच्या कोर्टातील निवाड्यांवरून दिसून येते. नवराबायकोचे परस्परांशी पटत नाही एवढ्या कारणावरूनही या निवाड्यांत घटस्फोट दिल्याची उदाहरणे आहेत.

आजच्या भारतभूची जी धार्मिक, सामाजिक व आर्थिक दुर्दशा चालू आहे तिचे खरे स्वरूप धूर्त इंग्रजांनी 'कायद्याचे राज्य', 'आधुनिक तंत्रज्ञान' वगैरेंसारख्या पोकळ शब्दावडंबरातून भारतीय समाजव्यवस्थेत घुसडून दिलेल्या विषाणूंमुळे उत्पन्न झालेले, अर्थव्यवस्थेचा नैसर्गिक विकास ठायी-ठायी अडवून तिला विनाशाच्या वाटेला लावणारे मानवनिर्मित अडथळे एवढेच आहे. स्वातंत्र्योत्तर या 'काळ्या इंग्रजां'नी विकासकामाच्या नावाने आजच्या घडीला अस्तित्वात असलेल्या व परंपरागत विकसित झालेल्या उत्पादक व्यवसायांवर घातली जाणारी कायद्याची बंधने, हे आहे. इंग्रजांनी भारतीय धर्मव्यवस्थेत घुसवलेले विषाणू समाजातील संबंधितांना त्यांच्या या दुर्दशेला समाजातीलच दुसरा वर्ग जबाबदार आहे, असे दाखवण्याचे काम करत असतो. त्यातूनच आजची सामाजिक तेढ निर्माण होते. एक उदाहरण देतो. आणीबाणीत विनोबा भावेंनी देशात सार्वत्रिक गोवधबंदी करावी यासाठी प्राणांतिक उपोषण केले. इंदिराजींचीही त्याला तयारी होती. त्यावेळी त्यांना समजले

की, स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लगेचच त्यावेळच्या मध्य प्रदेश सरकारने राज्यात सर्वत्र कायदेशीर गोवधबंदी केली; पण मुसलमान कसायांच्या पोटापाण्याची सोय काय? त्यामुळे अमरावतीतील वंशपरंपरागत 'गाय कसाई' समाजाने, या कायद्याने घटनेने सर्व भारतीय नागरिकांना दिलेल्या व्यवसायस्वातंत्र्याच्या मूलभूत अधिकाराचा संकोच होत आहे, आमच्या परंपरागत पिढिजात व्यवसायातून आम्हाला विस्थापित केले जात आहे, या मुद्यावर सुप्रीम कोर्टाचे दरवाजे ठोठावले. या कारणाने तो कायदा अवैध ठरेल हे मध्यप्रदेश सरकारच्या निदर्शनास सुप्रीम कोर्टाने आणून दिल्यावर, या गायकसायांच्या पिढिजात व्यवसाय-स्वातंत्र्याचे जतन करण्यासाठी, शासकीय पशुवैद्यांनी निरुत्पादक म्हणून सर्टिफिकेट दिलेले जनावर मारण्यास परवानगी देणारे कलम सुप्रीम कोर्टाच्या आदेशाने मध्यप्रदेश सरकारला या कायद्यात घालावे लागले. ही सर्व फाईल मुंबईतील सचिवालयातून आणून विनोबांना दाखवल्यावरच विनोबांनी उपोषण सोडले. या सर्वांतून साधले काय, तर हिंदू-मुसलमानांत तेढ व राष्ट्रीय उत्पादकतेत घट. जनावरे मारण्यापूर्वी त्यांना अनुत्पादक करणे, अगर तसे सर्टिफिकेट पैदा करणे, एकूण एकच काम.

जर अशा प्रकारे गोऱ्या व काळ्या इंग्रजांनी भारतीय अर्थव्यवस्थेत निर्माण केलेले सर्व अडथळे दूर करून भारतीय अर्थव्यवस्थेच्या नैसर्गिक विकासाचा मार्ग मोकळा केला तर, त्यातून चौफेर निर्माण होणाऱ्या व्यवसायांत गुंतलेला भारतीय समाज ब्रिटिशपूर्व कालाप्रमाणेच जातिधर्माची कृत्रिम कुंपणे मोडून पाचच वर्षांत जगातील प्रबळ अर्थसत्ता बनेल इतके अंगभूत सामर्थ्य आजही भारतीय अर्थव्यवस्थेत आहे. त्यामुळेच जगातील दरिद्री देशात गणला जाणारा भारत आजही एक अब्जापेक्षा जास्त माणसे पोसत आहे. ही वस्तुस्थिती कुणालाही तपासून पाहता येईल. भारतीय समाजाच्या व अर्थव्यवस्थेच्या सामर्थ्याचा मागोवा घेणाराला त्याचे मूळ युगपुरुष अशोकाच्या काळातील धर्मतत्त्वांच्या प्रसारात व राज्यसत्तेचे जनसत्तेत विलीनीकरण करून शासकीय हस्तक्षेपाशिवाय अर्थव्यवस्थेच्या नैसर्गिक विकासाला करून दिलेली संरचना यातच सापडेल. ■■








हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथंच प्रसिद्ध केले.




